# KAVITARTHACHANDRIKÁ.



A COMMENTARY ON THE POEMS OF THE

MARAṬHÍ FOURTH BOOK

BY



NARAYANA SHASTRI SATHAYE.



Bombay:

PRINTED BY BÁBÚ MORESHWER AT THE

"INDU-PRAKÁSH" PRESS.

1870.

Price Ans. 5½.

(*Registered under Act XXV. of* 1867.)

# कवितार्थचंद्रिका.

मराठी चौथे पुस्तकांतील कवितांवरील टीका,

हा ग्रंथ

नारायण शास्त्री साठये,

ह्यांनीं

तयार केला,

तो

मुंबई एथें

"इंदुप्रकाश" छापखान्यांत बाबु मोरेश्वर यांनीं छापिला.

सन १८७०.

किंमत ५॥ आणे.

# प्रस्तावना.

सुरस व मनोरंजक कविता वाचण्याचा ज्यांस छंद आहे अशांस, व विशेषकरून शाळांतून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांस आपल्या हातून कांहीं उपयोग व्हावा अशा हेतूनें मराठी चौथे पुस्तकांतील समग्र कवितांच्या अर्थाचें मीं हें पुस्तक तयार केलें आहे. ह्यांत कवितांचा अर्थ दाखवितांना लिहिण्याची अशी सरणि ठेविली आहे कीं, अर्थ समजण्यास कठीण असा प्रत्येक संस्कृत व जुनाट प्राकृत शब्द ह्यांचा सुगमरीतीनें अर्थबोध करून देऊन कवितेच्या अर्थाचें एकंदर स्वरूप वाचकांच्या लक्षांत सहज उभें राहावें अशी योजना केली आहे. चौथे पुस्तकाच्या शेवटीं अभिमन्युवधाच्या ज्या ओंव्या दिल्या आहेत त्यांचा अर्थ सहज समजण्याजोगा आहे म्हणून त्यांचा अक्षरशः अर्थ न देतां त्यांतील सर्व कठीण शब्दांची अनुक्रमवार याद ह्या पुस्तकाच्या शेवटीं दिली आहे.

ह्या पुस्तकाचें **कवितार्थचंद्रिका** असें नांव ठेविलें आहे. कितीएक स्थळीं कवीचा हृद्गतार्थ मार्मिकरीतीनें समजणें कठिण आहे, तथापि तो अभिप्राय जितका यथामति समजून उघड करवला तितका केला आहे. इतकेंही असून स्थलपरत्वें ह्या पुस्तकांत कोठें काठिन्य किंवा इतर दोष राहिले असतील त्यांबद्दल क्षमा करणें हें विद्वज्जनांकडे आहे.

नारायण शास्त्री साठये.

हा ग्रंथ लिहिण्यांत लाघवाकरितां दोन
खुणा योजिल्या आहेत.

( ह्म० )
( – )
} ह्मणजे.

# मनास बोध.

## श्लोक रामदासी.

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें
तरी देव तो पाविजेतो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें सर्व सोडोनि द्यावें
जनीं वंद्य तें सर्व भावें करावें ॥ १ ॥

टीका ॥ मन हें सर्व इंद्रियांचा राजा आहे, ह्मणून त्यास बोध केला ह्मणजे सर्व इंद्रियें त्याच्या आज्ञेप्रमाणें सहजच वागतील, अशा अभिप्रायानें रामदास प्रथम मनास बोध करितात. परंतु मनासारिखी चंचल वस्तु दुसरी कोणतीच नाहीं, ह्याकरितां हा बोध ऐकण्यास त्यानें क्षणभर स्थीर राहावें, ह्मणून त्यास बहुमान देऊन रामदास हाक मारितात.

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें. हे सज्जना मना, ह्म० बा भल्या अंतःकरणा, भक्तीच्या पंथानें ह्म० मार्गानेंच तूं चालावें. तूं जर असें चाललेंस. तरी देव तो पाविजेतो स्वभावें. तर तो देव तुला स्वभावें ह्म० सहजच पाविजेतो प्राप्त होतो ह्म० प्राप्त होईल. ह्म० मग तुला ईश्वरप्राप्तीविषयीं श्रम पडणार नाहींत. तसेंच. जनीं निंद्य तें सर्व सोडोनि द्यावें. जनीं—लोकांत निंद्य ह्म० निंदा करण्याजोगें, अर्थात जें वाईट तें

तूं सर्व सोडून दे. आणि. जनीं वंद्य तें सर्व भावें करावें. लोकांत वंद्य ह्म० सन्मान मिळण्या जोगें अर्थात जें चांगलें असेल तें तूं सर्व भावें 'ह्म० सर्व प्रकारें करावें.

मना वासना दुष्ट कामा नये रे
मनां सर्वथा पापबुद्धी नको रे ॥
मना सर्वथा नीति सोडूं नको हो
मना अंतरीं सारवीचार राहो ॥ २ ॥

टीका ॥ मना वासना दुष्ट कामा नये रे. रे मना, ह्म० अरे अंतःकरणा, दुष्ट वासना ह्म० वाईट इच्छा कामीं पडत नाहीं. ह्म० तिजपासून नाशच होतो. मना सर्वथा पापबुद्धी नको रे. अरे अंतःकरणा, पाप करण्याविषयींची बुद्धि तुला सर्वथा ह्म० अगदीं नको. मना सर्वथा नीति सोडूं नको हो. अरे अंतःकरणा, तूं नीति—चांगला मार्ग अगदीं सोडूं नको. मना अंतरीं सार वीचार राहो. हे अंतःकरणा, सार वीचार ह्म० उत्तम विचार अंतरीं ह्म० आंत ह्म० तुझ्यांत राहूंदे.

मना पापसंकल्प सोडूनि द्यावा
मना सत्यसंकल्प जीवीं धरावा ॥
मना कल्पना ते नको वीषयाची
विकारें घडे हो जनीं सर्व छी छी ॥ ३ ॥

टीका ॥ मना पापसंकल्प सोडूनि द्यावा. हे मना, पापाचा सकल्प—कल्पना सोडून तूं दे. मना सत्यसंकल्प जीवीं धरावा. हे मना, सत्याचा संकल्प

ह्म० खरेपणाचा कोणताही बेत तूं आपल्या जीवीं धरावा. येथें मन हें कोणी मनुष्य आहे अशी कल्पना करून त्यास जीव कल्पिला आहे. असें समजावें. मना कल्पना ते नको वीषयाची. हे मना वीषयाची—स्त्रीविषयाची वगैरे ते ह्म० ती कल्पना—इच्छा तुला नको. कारण, विकारें घडे हो जनीं सर्व छी छी. विकारें ह्म० मन विघडल्यानें जनीं ह्म० लोकांत सर्व छी छी होते. ह्मणून दुष्ट स्त्रीविषयांत वगैरे तूं लागल्यानें सर्व लोक तुझी छी थू करतील हाभाव.

**नको रे मना क्रोध हा खेदकारी**
**नको रे मना काम नानाविकारी ॥**
**नको रे मना लोभ हा अंगिकारूं**
**नको रे मना मत्सरू दंभभारू ॥ ४ ॥**

टीका ॥ नको रे मना क्रोध हा खेदकारी. रे मना, खेद ह्म० दुःख, कारी—करणारा ह्म० दुःख देणारा असा क्रोध ह्म० राग तुला नको. नको रे मना काम नानाविकारी. अरे मना, नाना—बहुत प्रकारचे जे विकार ते उत्पन्न करणारा असा काम ह्म० विषयोपभोग हा तुला नको. नको रे मना लोभ हा अंगिकारूं. रे मना, हा लोभ तूं अंगिकारूं नको ह्म० स्वीकारूं नको. नको रे मना मत्सरू दंभभारू—अरे मना, मत्सरू ह्म० द्वेष किंवा हेवा, हा तुला नको. तसेंच दंभ ह्म० दांभिकपणा याचें भारू ह्म० ओझें हेंही नको.

**मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें**
**मना बोलणें नित्य सोशीत जावें ॥**
**स्वयें सर्वदा नम्र वाचें वदावें**
**मना सर्व लोकांस रे नीववावें ॥ ५ ॥**

**टीका** ॥ मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें. हे मना, श्रेष्ठ ह्म० उत्तम अर्थात चांगलें काम करण्यास दाखविलेलें असें धारिष्ट ह्म० धैर्य हें तूं आपल्या जीवीं धरावें. मना बोलणें नित्य सोशीत जावें. हे मना, लोक तुला कांहीं वाईट बोलले असतां तूं नेहमीं तें सोशीत जावें. स्वयें सर्वदा नम्र वाचें वदावें. स्वयें ह्म० आपण सर्वदा—नेहमीं लोकांशीं नम्र ह्म० गरिबीच्या अशा वाचें ह्म० वाणीनें वदावें ह्म० बोलावें. ह्म० आपण कोणाशीं दांडगेपणानें बोलूं नये, तर गरिबीनेंच बोलावें. मना सर्व लोकांस रे नीववावें. रे मना, आपल्या भाषणानें वगैरे लोकांस आपण नीववावें ह्म० त्यांचें सांत्वन करून त्यांस संतुष्ट करावें.

---

## वसंत ऋतूचें वर्णन.

### श्लोक.

**ऋतूंमधें हा पहिला वसंत**
**वाटे जनांला बहुधा पसंत ॥**
**कीं बोलती हाच सदा असावा**
**असें न कोणी ह्मणती नसावा ॥ १ ॥**

**टीका ॥** ऋतूंमधें हा पहिला वसंत. वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत, शिशिर; असे वर्षाचे सहा ऋतु आहेत. त्यांत वसंत ऋतु हा पहिला आहे. वाटे जनांला बहुधा पसंत. . हा वसंत ऋतु जनांला—लोकांस बहुधा—पुष्कळ प्रकारांनीं पसंत ह्म० प्रिय वाटतो. तो किती प्रिय आहे, तर. कीं बोलती हाच सदा असावा. लोक बोलतात कीं, हा वसंत ऋतुच सदा—नेहमीं असावा. असें न कोणी ह्म[illegible] नसावा असें कोणी ह्मणत नाहीं.

> वारा क[illegible] ।
> वारूनि [illegible] तो ॥
> छाया तरूची बहु तोषदायी
> आहे तशी हे घन आंबराई ॥ २ ॥

**टीका ॥** वारा कसा शीतळ मंद येतो. वसंत ऋतूंत वारा कसा शीतळ ह्म० थंड असून तो मंद येतो ह्म० झुळझुळ वाहतो. वारूनि तापा बहु सौख्य देतो. असा थंड झुळझुळ वारा वाहूं लागला, ह्मणजे ताप—ऊष्मा किंवा गर्मी हीं वारून ह्म० घालवून तो बहु—फार सुख देतो. छाया तरूची बहु तोषदायी. ह्या ऋतूंत झाडांस पालवी फुटत असते म्हणून अशा पालवलेल्या तरूची—झाडाची छाया—सावली ही बहु तोषदायी. बहु—फार तोष ह्म० संतोष त्यातें दायी—देणारी आहे. ह्म० झाडाच्या सावलींत बसणाऱ्यांस ह्या दिवसांत फार सुख वाटतें. आहे तशी हे घन आंबराई. तशी ह्म० बहुत सुख देणारी अशी घन ह्म० दाट लागलेली ही आंबराई आहे.

तरुस नूतन पल्लव फूटती
मधुर पुष्पसुवासहि सूटती ॥
भ्रमर त्यांवरुनी न च ऊठती
रस फुलांतिल निर्भय लूटती ॥ ३ ॥

**टीका** ॥ आपखी ह्या ऋतूंत कायकाय होत असतें. तरुस नूतन पल्लव फूटती. तरुस ह्म० झाडास नूतन— नवीन पल्लव—पालवी फुटते. मधुर पुष्पसुवासहि सूटती. फुलांचे मधुर ह्म० गोड असे सुवास—सुगंधही सुटतात. फुलांवर भ्रमर मद खाण्याकारितां बसत असतात ह्मणून. भ्रमर त्यांवरुनी नच ऊठती, फुलांवर बसलेले भ्रमर त्यांवरुन उठतच नाहींत. आणि. रस फुलांतिल निर्भय लूटती. फुलांतला रस ह्म० मद ते निर्भयपणानें लुटून घेत असतात.

नवे दीसती चित्र ज्याचे पिसारे
तुरा मस्तकीं शोभतो हा कसा रे ॥
कदंबावरी स्वप्रियेच्या समोर
पहा नाचतो होउनी मत्त मोर ॥ ४ ॥

**टीका** ॥ नवे दिसती चित्र ज्याचे पिसारे. चित्र ह्म० विचित्र रंगाचे असे ज्या मोराचे पिसारे ह्म० पिसांचे समुदाय नवे रंग चढवून जसे नुकतेच तयार केलेले असे ह्या वसंत ऋतूंत दिसतात. तुरा मस्तकीं शोभतो हा कसा रे. त्या मोराच्या मस्तकावर हा तुरा कसा रे सुंदर शोभतो आहे. कदंबावरी स्वप्रियेच्या समोर. कदंबावरी ह्म० कळंबाच्या झाडावर स्वप्रियेच्या—आपल्या

बायकोच्या (लांडोरीच्या) समोर. पहा नाचतो होउनी मत्त मोर. मोराजवळ लांडोरी होती आणि वसंताची सुंदर शोभा, ह्यांमुळें मोर मत्त म्ह० उन्मत्त अर्थात आनंदभरित होत्साता पहा कसा नाचतो आहे तो.

वृक्षस्कंधीं बांधुनी लांब दोले
घेती नारी बैसुनी तेथ झोले ॥
ओंव्या गाती स्वप्रियातें बहाती
क्रीडाया ती लोक लीला पहाती ॥ ५ ॥

टीका॥ वृक्षस्कंधीं बांधुनी लांब दोले. झाडांच्या स्कंधीं म्ह० फांद्यांवरून लांब दोरांचे दोले—झोंपाळे बांधून. घेती नारी बैसुनी तेथ झोले. त्या झोंपाळ्यांवर बसून नारी म्ह० स्त्रिया झोंके घेतात. ओंव्या गाती स्वप्रियातें बहाती क्रीडाया. स्त्रिया तेथें ओंव्या गातात आणि स्वप्रियातें म्ह० आपले प्राणप्रिय भर्ते ह्यांस आपल्याबरोबर झोंपाळ्यांवर क्रीडाया—क्रीडा करण्यासाठीं बहाती—हाक मारितात. ती लोक लीला पहाती. इतरलोक ती लीला म्ह० तो खेळ पहातात.

श्रांता स्वकांता निरखोनियां करी
करी करानें जलसेक तीवरी ॥
छत्रापरी पुष्करपत्रही धरी
स्नेहें प्रियेचा श्रमखेद तो हरी ॥ ६ ॥

टीका॥ श्रांतां स्वकांता निरखोनियां करी. करी म्ह० हत्ती हा स्व—आपली कांता—बायको ( हत्तीण ) ही श्रांता म्ह० दमलेली अशी निरखोनियां—पाहून. करी करा-

नें जलसेक तीवरी. आपल्या करानें-सोंडेनें जलसेक. जल-पाणी ह्याचा सेक-शिंपडणें हें तिजवर करतो. ह्म० हत्ती तिजवर पाणी शिंपडतो. छत्रापरी पुष्कर पत्रही धरी. आणि पुष्करपत्र. पुष्कर-कमळ ह्याचें पत्र ह्म० पान हें स्नेहें ह्म० मायेनें छत्रीप्रमाणें तिजवर धरितो. अशा प्रकारें तो. प्रियेचा श्रम खेद हरी. प्रियेचा-बायकोचा श्रम आणि खेद-दुःख हीं दूर करतो.

कुंजांत घोर घुबडें बसती तयांचे
घूत्कार ऐकुनि मुके व्रज वायसांचे ॥
श्येनस्वना परिसतांचि समस्त सर्प
वृक्षावरी लपति होउन नष्टदर्प ॥ ७ ॥

**टीका** ॥ कुंजांत घोर घुबडें बसती. कुंज ह्म० वेलींनीं बांधलेल्या मंडपांत घोर-भयंकर अशीं घुबडें बसती-बसतात. तयांचे घूत्कार ऐकुनि मुके व्रज वायसांचे. तयांचे ह्म० त्या घुबडांचे घूत्कार-शब्द ऐकून वायसांचे-कावळ्यांचे व्रज ह्म० समुदाय मुके होतात. कारण, घुबडें आणि कावळे यांचें परस्पर वैर आहे ह्मणून त्यांस घुबडांपासून फार उपद्रव होत असतो. तसेंच, श्येनस्वना परिसतांचि समस्त सर्प. श्येन-ससाणा ह्याचा स्वन-शब्द परिसतांचि-ऐकतांच समस्त-सगळे साप हे नष्टदर्प. नष्ट-नाहींसा झाला आहे दर्प-गर्व ज्यांचा ह्म० सापांचा गर्व नाहींसा होऊन. वृक्षावरी लपति ह्म० ते झाडावर लपून बसतात.

## स्फुट सवय्या.

वैभव शाश्वत नाहिंच यास्तव
कांहिं तरी उपकार करा
धर्मचि हा परलोकसखा निज-
तारक होइल तोचि खरा ॥
दुर्जनसंगति सोडुनि दुर्मति
सज्जनसंगति नित्य धरा
श्रीहरिचे मनिं पाय धरा निज-
तारणिं हाच उपाय बरा ॥ १ ॥

**टीका** ॥ साधु इतरजनांस उपदेश करितात. वैभव शाश्वत नाहिंच. वैभव ह्म० संपत्ति ही शाश्वत—नेहमीं राहणारी नाहींच. यास्तव कांहिं तरी उपकार करा. ह्मणून तुह्मांजवळ संपत्ति आहे तोंपर्यंत लोकांवर कांहीं उपकार करित जा. धर्मचिहा परलोक सखा. धर्म हाच परलोकसखा. परलोकचा ह्म० स्वर्गलोकींचा सखा—मित्र ह्म० हित करणारा आहे. निजतारक होइल तोचि खरा. निज आपला—तारक ह्म० तारणारा तो धर्मच खरोखर होईल, दुसरा कोणी होणार नाहीं. दुर्जनसंगति सोडुनि दुर्मति. दुर्जन—वाईट मनुष्य यांची संगति—समागमं, तशीच दुर्मति—वाईट बुद्धि हीं सोडून. सज्जनसंगति नित्य धरा.° सज्जनांची—साधूंची संगत तुह्मी नेहमीं धरा. श्रीहरिचे मनिं पाय धरा. भगवंताचे पाय आपल्या मनांत धरा—आठवा. निजतारणिं हाच उपाय बरा. वर

सांगितलेला उपाय हाच निजतारणिं. निज—स्वकीय जें तारण—मुक्ति ह्म० आपणास तारण्याविषयीं उत्तम आहे.

पाहुनि दीन जनास जळाविण
मीन जसा अति दुःखित होतो
कष्टवुनी निजदेह जना बहु
तुष्टवि नित्यचि साधु अहो तो ॥
जो उपकार करी सुजनावरि
अंतरिं निर्मळ भाव धरी तो
साधितसे परकीयहिता परि
साधन आत्महितींच करी तो ॥ २ ॥

टीका ॥ साधु कोणास म्हणावें ह्याविषयीं. पाहुनि दीनजनास जळाविण मीन जसा अति दुःखित होतो. जळाविण—पाण्यावांचून मीन—मासा जसा तळमळतो, तसा दीनजनास ह्म० एखाद्या गरीब अनाथ मनुष्यास पाहून ज्याला फार दुःख होतें. तसेंच. कष्टवुनी निजदेह. निज ह्म० आपला देह—शरीर त्यास कष्टवुनी—श्रम देऊन. जना बहु तुष्टवि नित्यचि. जो नित्य जना—लोकांस बहु तुष्टवि—फार आनंदित करतो, अहो त्यालाच साधु ह्मणावें. जो उपकार करी सुजनावरि. सुजनावरि—चांगल्या मनुष्यावर, जो उपकार करतो. अंतरिं निर्मळ भाव धरी. अंतरिं—अंतःकरणांत, निर्मळ—स्वच्छ किंवा कपट ज्यांत नाहीं असा भाव—भक्ति ज्याची आहे. ह्म० परोपकार करणें वगैरे कोणतेंही सत्कृत्य जो निष्कपटबुद्धीनें करितो. साधितसे परकीयहिता. असा सज्जन

मनुष्य परकीय–दुसऱ्याचें हित जरी साधितसे ह्म० करित आहे. परि साधन आत्महितींच करी तो. परि–परंतु आत्महितींच–आपल्या हिताविषयींच तो साधन–उपाय करित आहे असें समजावें. कारण परहित केल्यानें ईश्वर संतुष्ट होऊन त्यांत त्याचेंही अर्थांत हित होतेंच असा भाव.

च या कलिमाजि जना पर-
असा दुसरा न दिसे
मिळेल कसा मज राहिल
तो जवळी मनिं हेंचि वसे ॥
अर्थसुयोगवियोगहि केवळ
दुःख अजस्रहि देत असे
अर्थ परासि कळेचि न हा वरि
अर्थ असोनि अनर्थ असे ॥ ३ ॥

टीका ॥ कलियुगांत मनुष्य धनलोभी फार अशा अभिप्रायानें कवि वर्णन करितो. अर्थचि या कलिमाजि जना परमार्थ असा दुसरा न दिसे. या कलिमाजि ह्म० या कलियुगांत जना–लोकांस अर्थाचि ह्म० द्रव्यच कायतो परमार्थ ह्म० उत्कृष्ट जोड आहे, असें दुसरें कांहींच नाहीं असें वाटतें, त्यांस निजध्यास काय तो एके गोष्टीचा कीं, अर्थ मिळेल कसा मज. अर्थ ह्म० द्रव्य मला मिळेल कसें आणि. राहिल तो जवळी. आणि मिळविलेलें द्रव्य मजजवळ राहील कसें. मनिं हेंचि वसे. ह्या गोष्टीचीच मनांत काय ती चिंता दुसरी कांहीं नाहीं. परंतु वास्त-

विक पाहिलें असतां. अर्थ सुयोगवियोगहि केवळ दुःख अजस्रहि देत असे. अर्थ—द्रव्य ह्याचा सुयोग ह्म० तें आपल्या जवळ असणें आणि तसाच वियोग—तें आपल्या जवळून जाणें ह्या दोन्ही गोष्टी अजस्रही ह्म० नेहमींच केवळ दुःख देणाऱ्या आहेत. परि अर्थपरासि कळेचि न. परंतु अर्थपरासि ह्म० द्रव्यलोभी मनुष्यास हें कळतच नाहीं कीं. वरि अर्थ असोनि अनर्थ असे. द्रव्य हें वरून अर्थ दिसतो खरा, पण वास्तविक पाहिलें असतां द्रव्य अनर्थ ह्म० दुःखाचें केवळ स्थान आहे.

मृत्युपरीसहि निर्धनता अति
दारुण तेज जनांत हरी
जो निज कीं परकीयहि पाहुनि
निर्धन तो अपमान करी ॥
स्त्री सुत ही अवमानि निरंतर
भाषण कोणि मनीं न धरी
दुःखचि अंतरिं बाहिर त्यास
महीवरि दुर्गति हीच खरी ॥ ४ ॥

टीका ॥० मृत्युपरीसहि निर्धनता अतिदारुण. निर्धनता ह्म० दारिद्र्य हें मृत्युपरीसहि—मरणापेक्षांदेखील अतिदारुण ह्म० फार भयंकर आहे, एकवेळ मरण पुरवेल, पण दरिद्रीपणा पुरवणार नाहीं असा भाव. दरिद्री मनुष्याचे कसे हाल होतात ते पाहा. तेज जनांत हरी. दरिद्री मनुष्याचें जनांत—लोकांत तेज, दारिद्रीपणा नाहींसें

करितो म्ह० त्याची लोकांत वजनदारी नसते. जो निज कीं परकीयाहिं पाहुनि निर्धन तो अपमान करी. निज म्ह० आपला, कीं—किंवा परकीय—परका, कोणीही असो, तो निर्धन म्ह० दरिद्री पाहून त्याचा अपमानच करतो. दुसरे तर असूंद्या, पण स्त्री सुतही अवमानि निरंतर. त्याची बायको आणि सुत—पुत्र हीं देखील त्याचा नेहमीं अपमान करितात. भाषण कोणि मनीं न धरी. त्याचें बोलणें मनावर कोणीच घेत नाहीं. दुःखचि अंतरिं बाहिर. त्या मनुष्यास अंतरीं—आंत व बाहेर सर्व दुःखच. त्यास महीवरि दुर्गति हीच खरी. परलोकीं नरक आहे म्हणून सांगतात, परंतु दरिद्री मनुष्यास महीवरि—या भूलोकावरच खरी दुर्गति म्ह० खरा नरक आहे, म्हणून दरिद्रीपणा फार वाईट आहे हें तात्पर्य.

जीस गमे पद अन्यगृहीं जर
ठेवियलें जणु सर्पशिरीं
वाक्य जिचें अति दुर्लभ ज्यापरि
दुर्मिळ जें धन लोभिकरीं ॥
कांतसमागम तेंचि गमे सुख-
पर्व नसे जरि वित्त घरीं
शांत मनें निजकांतमतें करि
कृत्य सती जनिं तीच खरी ॥ ५ ॥

**टीका** ॥ पतिव्रता स्त्री कोणास म्हणावें याविषयीं कवि सांगतो. जीस गमे पद अन्यगृहीं जर ठेवियलें जणु सर्पशिरीं. अन्यगृहीं म्ह० दुसऱ्याच्या घरीं जर

पद—पाऊल ठेविलें तर ज्या स्त्रीस असें गमे—वाटतें कीं, अणु तें पाऊल आपण सर्पशिरीं ह्म० सर्पाच्या शिरीं— मस्तकावरच ठेविलें कीं काय ह्म० ती इतकी मर्यादशीळ असते कीं, आपल्या घराबाहेर योग्य कारणावांचून पाऊल कधीं ठेवीत नाहीं. वाक्य जिचें आति दुर्लभ ज्यापरि दुर्मिळ जें धन लोभिकरीं. जिचें वाक्य म्ह० बोलणें हें ऐकणारास आति दुर्लभ म्ह० प्राप्त होण्याला फार कठीण म्ह० तिचें बोलणें इतकें मर्यादेचें व हळू कीं, लोकांस ऐकूं देखील येत नाहीं. यास दृष्टांत. लोभिकरीं. लोभी— कृपण ह्याच्या करीं— हातांतजें धन— द्रव्य तें जसें कोणास मिळावयाचें नाहीं, तसें पतिव्रता स्त्रीचें भाषण दुर्लभ असतें. कांतसमागम तेंचि गमे सुखपर्व नसे जरि वित्त घरीं. घरांत वित्त— द्रव्य नसलें म्ह० पदरीं गरिबी असली तरी. कांतसमागम. कांत—आपला पति याशीं जो समागम म्ह० सहवास हाच जिला सुखपर्व म्ह० सुखाचा अतिशय असा गमे—वाटतो म्ह० मोठ्या गरिबींतही पतीची सेवा जर आपल्या हातून घडत आहे, तर त्यांत सर्व सुखें आलीं असें तिला वाटतें. शांतमनें निजकांतमतें करि कृत्य. शांतमनें—शांत अंतःकरणानें आणि निजकांतमतें. निज— आपला कांत—नवरा ह्याच्या मतें ह्म० विचारानें जी ह्या संसारांतील वगैरे कृत्य —काम करते, अशी वर्तणूक जिची असेल. सती जनीं तीच खरी. जनीं—लोकांत सती—पतिव्रता तीच खरी. तिलाच पतिव्रता हें नांव साजे.

———

# पद्यात्मक लघुहितोपदेश ह्यांतील कविता.

## देवाविषयीं.

### अभंग.

**देवें केला उपकार । स्मरा मनीं निरंतर ॥ १ ॥**

टीका ॥ देवानें केलेला जो उपकार तो तुम्हीं निरंतर—नेहेमीं स्मरा—आठवा.

**देव दयाळू जगाचा । दाता सर्व पदार्थांचा ॥ २ ॥**

टीका ॥ देव जगाचा म्ह० ब्रह्मांडाचा दयाळू—कृपाकरणारा आहे ह्म० देव सर्वांवर दया करितो. तो सर्व पदार्थांचा दाता—देणारा आहे.

**धरोनियां भाव देवीं । वचन सत्य ऐसें ठेवीं ॥ ३ ॥**

टीका ॥ देवाचेठायीं भाव—भक्ति ठेवून आपलें वचन म्ह० भाषण सत्य—खरें असें तूं ठेव म्ह० खोटें बोलूं नको. ह्या अभंगाशीं पूर्व अभंगाचा संदर्भ जोडून असाही कित्येक अर्थ करितात कीं, देवाचेठायीं भाव धरून वचन म्ह० वाक्य तें कोणतें तर (देव दयाळू जगाचा इ० ) हें सत्य म्ह० खरें असें ठेव म्ह० मान.

**आज्ञा देवाची मानावी । स्तुती देवाची करावी ॥ ४ ॥**

टीका ॥ आपण देवाची आज्ञा मानावी म्ह० आज्ञा असेल तसें चालावें, आणि देवाची स्तुति करावी.

---

## प्रामाणिकपणाविषयीं.

### ओंव्या.

प्रामाणिका लोक मानिती। त्याची होतसे जगीं ख्याती।
अंतीं त्यास उत्तम गती। त्रैलोक्यपती देतसे ॥ १ ॥

टीका ॥ प्रामाणिका लोक मानिती. प्रामाणिका—खरे-पणानें चालणाऱ्या मनुष्यास लोक सन्मान देतात. त्याची जगांत— लोकांत ख्याती— कीर्ति होते. आणि त्रैलोक्य-पती—स्वर्ग, मृत्यु, पाताळ ह्यां तीन लोकांचा पति म्ह० पालन करणारा जो ईश्वर तो त्या प्रामाणिक मनुष्याला अंतीं— शेवटीं उत्तम गती— मोक्ष देतो.

प्रामाणिक मनुष्याची कीर्ती ।
इहपरलोकीं सर्व गाती ।
सज्जन त्याची पाहोनि मूर्ती ।
संतोषती मनांत ॥ २ ॥

टीका ॥ प्रामाणिक मनुष्याची जी कीर्ति म्ह० त्याच्या उत्तमगुणांची प्रशंसा ती इह—भू लोकीं आणि परलोकीं—स्वर्गलोकीं, सर्व करितात. सज्जन त्याची पाहोनि मूर्ती. त्याची मूर्ति पाहून— त्याला पाहून सज्जन म्ह० साधु मनांत संतोष पावतात.

---

## वडिलांचा मान.

### आर्या.

जो तुज विद्या सांगे,
जो रक्षी प्राण अन्न देऊन ॥
जो भय संकट वारी
हे बापासम तिघे नव्हत ऊन ॥ १ ॥

टीका ॥ जो तुला विद्या सांगतो, जो अन्न देऊन तुझे प्राण राखतो, जो तुझें भय आणि संकट ह्यातें वारी म्ह० दूर करितो हे म्ह० विद्यादाता, अन्नदाता, आणि संकटाचें निवारण करणारा हे तिघे बापासम म्ह० तुला बापासारखेच पूज्य आहेत. नव्हत ऊन—बापापेक्षां ते ऊन म्ह० उणे नाहींत.

जर आपण वडिलांची
मर्यादा ठेविली तरिच बाळ ॥
ठेवितिल पुढें तैशी
आपुलि ते न करितील आबाळ ॥ २ ॥

टीका ॥ जर आपल्या वडिलांची आपण मर्यादा—सन्मान राखला, तर तें पाहून बाळ म्ह० आपलीं मुलें पुढें आपली तशीच मर्यादा राखतील. आपुलि ते न करितील आंबाळ. आणि ते आपली आबाळ म्ह० हाल अपेष्टा करणार नाहींत.

---

## सदाचरणाविषयीं.

### आर्या.

परधन कलहें द्यूतें
चोरीनें त्वां कधीं न मिळवावें ॥
मन परकांतेवरती
जातां आधीं तयासि वळवावें ॥ १ ॥

टीका ॥ परधन कलहें द्यूतें चोरीनें त्वां कधीं न मिळवावें. कलहें—वाज्जानें तसेंच द्यूतें म्ह० जुव्यानें. म्ह० कलह करून किंवा जुवा खेळून अथवा चोरी करून तूं परधन—दुसऱ्याचा पैसा घेऊं नको. मन परकांतेवरती जातां आधीं तयासि वळवावें. परकांता, पर—दुसरा त्याची कांता—बायको म्ह० परस्त्री हिजवर तुझें मन जातांक्षणींच तयासि म्ह० त्या मनाला तूं अगोदर वळवावें म्ह० तें तेथें गेल्याबरोबर त्याला तेथून काढावें.

त्वां मदतीस न जावें
न शिरावें मसलतींत बंडाच्या ॥
खोटें कर्म करूनि तूं
देंउं नको द्रव्यराशि दंडाच्या ॥ २ ॥

टीका ॥ बंडाच्या मदतीस म्ह० बंडाला साहाय्य करण्यास त्वां जाऊं नये. तसेंच बंडाच्या मसलतींत तूं शिरूं नये. खोटें—वाईट कर्म करून तूं सरकारांत दंड देण्याकरितां द्रव्याच्या राशि देऊं नको.

सत्य सदा बोलावें
सांगे गुरु आणि आपुला बाप ॥
खोटें भाषण करणें
सज्जन म्हणतात हें महापाप ॥ ३ ॥

टीका ॥ आपण सदा—नेहमीं सत्य—खरें बोलावें असें आपला गुरु सांगतो आणि बापही सांगतो. हेच दोघे सांगतात असें नाहीं तर. खोटें भाषण करणें हें सज्जन—साधु महापाप म्ह० मोठें पातक आहे असें ह्मणतात.

अन्योपकार करणें
सद्गुण पुरुषास हाच ह्मणतात ॥
पीडा परास देणें
ज्ञाते हें फार पाप गणतात ॥ ४ ॥

टीका ॥ अन्योपकार करणें सद्गुण पुरुषास हाच ह्मणतात. अन्य—दुसरे ह्यांवर उपकार करणें ह्म० त्यांचें बरें करणें हाच पुरुषास सद्गुण ह्म० मनुष्यांत हाच उत्तम गुण होय असें जाणते लोक ह्मणतात. पीडा परास देणें. परास—दुसऱ्यास, पीडा—दुःख देणें. ज्ञाते हें फार पाप गणतात. ज्ञाते—शाहणे लोक हें मोठें पाप आहे असें गणतात म्ह० मोजतात, अर्थात मानतात.

दिधलें दुःख परानें
उसनें फेडूं नयेचि सोसावें ॥
शिक्षा देव तयाला
करिल म्हणोनी उगेंच बैसावें ॥ ५ ॥

**टीका** ॥ दिधलें दुःख परानें. परानें—दुसऱ्यानें आपणास दुःख दिधलें—दिलें तर उसनें फेडूं नयेचि. म्ह० त्यास आपण उलट दुःख देऊंच नये. तर सोसावें म्ह० तें दुःख आपण साहून राहावें. त्यावेळेस आपल्या मनाचें आपण असें समाधान करावें कीं. शिक्षा देव तयाला करिल. सर्व पाहणारा जो देव तो तयाला—त्या दुःख देणाऱ्याला. शिक्षा—शासन करील, असें मनांत आणून आपण स्वस्थ बसावें.

---

## दुष्ट व्यसनें.

गांजा ओढुं नको सुरा पिउं नको
तूं भांग घोटूं नको
गोळी खाउं नको अफू शिवुं नको
माजूम सेवूं नको ॥

कांहीं चोरूं नको उगा फिरूं नको
वेश्येसि पाहूं नको
विद्याज्ञानधना सदा मिळविल्या
संचून राहूं नको ॥ ६ ॥

**टीका** ॥ तूं गांजा ओढूं नको. सुरा— दारू तूं पिऊं नको. तूं भांग घोटूं नको. गोळी— तंबाखूची गोळी तूं खाऊं नको. अफूचा कैफ करणें फारच दुष्ट व्यसन आहे, म्हणून त्या अफूला तूं शिवूं देखील नको. माजुम तूं खाऊं नको. काहीं वस्तु चोरूं नको. रि-

कामटवळ्या सारखा उगीच इकडे तिकडे भडकत फिरूं नको. वेश्येसि पाहूं नको. वेश्येसि म्ह० कसबिणीकडे तूं पाहूं देखील नको. विद्या, ज्ञान— शाहाणपण आणि धन म्ह० द्रव्य हीं सदा— नेहमीं मिळविल्यावांचून तूं राहूं नको. म्ह० तुझा वेळ ह्या तीन गोष्टींचें संपादन करण्यांत नेहमीं घालीत असा भाव.

---

## शबरीचें आख्यान.

### श्लोक.

ज्याच्या मस्तकिं दीर्घ नूतन जटा
फेंटा दिसे टोप तो
माजीं वेष्टित वल्कलें झळकती
दूजा म्हणे कोण तो ॥

आश्चर्या अति पावली बघुनियां
तूणीर पाठीवरी
राजीवाक्ष असा विलोकुनि वधू
धांवे जशी बावरी ॥ १ ॥

**टीका** ॥ सीतालक्ष्मणांसहवर्त्तमान रामचंद्र दंडकारण्यांतून जात असतां, शबरी म्हणून एक भिल्लीण होती, तिनें मार्गावर रामलक्ष्मणांस दुरून पाहिलें, त्यावेळच्या प्रसंगाचें कवि वर्णन करितो. शबरीनें राम कसा पाहिला. ज्याच्या मस्तकीं दीर्घ नूतन जटा फेंटा दिसे टोप तो. दीर्घ म्ह० लांब वाढलेल्या व नूतन

म्ह० नुध्या अशा जटा ज्या रामचंद्राच्या मस्तकावर असून फेटा जसा डोक्याभोंवती गुंडाळतात तशा त्या जटा डोक्याभोंवती गुंडाळलेल्या होत्या, व तो जटाभार टोप घातल्याप्रमाणें दिसत असे. माजीं वेष्टित वल्कलें झळकती. आणि माजीं म्ह० मध्यें म्ह० कंबरेला वल्कलें म्ह० झाडांच्या सालींचीं केलेलीं वस्त्रें जीं वेष्टित–गुंडाळलीं होतीं तीं झळकती–देदीप्यमान दिसत. असा रामचंद्र पाहून त्याबरोबर लक्ष्मणही होता, त्याला पाहून शबरी मनांत म्हणते. दूजा कोण तो. दूजा–दुसरा तो कोण आहे. आश्चर्या अति पावली बघुनियां तूणीर पाठीवरी. रामलक्ष्मणांच्या पाठीवर तुणीर–भाते जेव्हां शबरीनें पाहिले, तेव्हां तिला फार आश्चर्य वाटलें कीं, जटा वल्कलें धारण करणाऱ्या अशा साधूंस भाते कशाला पाहिजेत. राजीवाक्ष असा विलोकुनि. राजीव म्ह० कमळ त्याप्रमाणें सुंदर आहेत अक्ष म्ह० नेत्र ज्याचे असा रामचंद्र विलोकुनि–पाहून. वधू धांवे जशी बावरी. वधू म्ह० स्त्री ती शबरी बावरी म्ह० घाबरी जशी एखादी असते तशी होऊन रामचंद्राकडे धांवत आली. कारण, रामाची ती सुकुमार मदनमूर्ति पाहून राम एकदां डोळे भरून केव्हां पाहीन असें तिला झालें.

देखोनि डोळां हृदयाभिरामा
रामापुढें धांवतसे सुकामा ॥
पुष्टांग झाली स्वसुखें भजाया
साष्टांग वंदी रघुराजपाया ॥ २ ॥

**टीका ॥** देखोनि डोळां ऱ्हदयाभिरामा. ऱ्हदय–अंतःकरण ह्यास आपल्या गुणांनीं व सौंदर्यानें, अभिराम म्ह० रमविणारा जो राम त्याला डोळ्यांनीं पाहून. रामापुढें धांवतसे सुकामा. सु म्ह० उत्तम आहे काम–इच्छा जीची म्ह० जी चांगल्या बुद्धीची अशी शबरी रामापुढें धांवत आली. पुष्टांग झाली स्वसुखें भजाया. रामाची मूर्ति पाहून जें तिला अतिशय सुख झालें त्या स्वसुखें–आपल्या सुखानें ती पुष्टांग झाली म्ह० तिचें शरीर आनंदानें फुलून गेलें. तें कशा करितां तर भजाया म्ह० रामाची सेवा करण्या करितां. साष्टांग वंदी रघुराजपाया. रामचंद्राच्या चरणावर तिनें साष्टांग नमस्कार घातला.

**बहू दीससी राघवा तूं भुकेला**
**तुवां पाहिजे बा फळाहार केला ॥**
**तुझ्या कारणें म्यां फळें गोड रामा**
**पहा आणिलीं सेविं सीताभिरामा ॥ ३ ॥**

**टीका ॥** बहू दीससी राघवा तूं भुकेला. हे राघवा म्ह० रामा, तूं फार भुकेलेला दिसतोस. तुवां पाहिजे बा फळाहार केला. म्हणून बा रामा, तूं फळाहार–फळांचा आहार म्ह० भक्षण केलें पाहिजे. तुझ्या कारणें म्यां फळें गोड रामा पहा आणिलीं. हे रामा, तुझ्याकारितां मीं मधुर फळें आणिलीं आहेत, हीं पाहा. सेविं सीताभिरामा. हे सीताभिरामा, सीता–जानकी तिला अभिराम म्ह० रमविणारा म्ह० हे जानकी पते रामचंद्रा, हीं मीं आणिलेलीं फळें तूं सेविं म्ह० खा.

**सारीं क्षतांकित फळें निरखोनि डोळां**
**कां हो अशीं तिस पुसे रघुराज भोळा ॥**
**चंचूपुटेंचि बहु टोंचिलिं पांखरांनीं**
**नेणों दिला प्रतिफळास नखांक रानीं ॥ ४ ॥**

**टीका ॥** सारीं क्षतांकित फळें निरखोनि डोळां. शबरीनें दाखविलेलीं सर्व फळें क्षतांकित. क्षतें–छिद्रें ह्यांनीं अंकित–चिन्हित झालेलीं म्ह० भोकें पडलेलीं अशीं तीं फळें रामचंद्रानें आपल्या डोळां म्ह० डोळ्यांनीं निरखोनि–पाहून. कां हो अशीं तिस पुसे रघुराज भोळा. अहो, अशीं हीं कुरतुडलेलीं फळें कां, असें भोळा जो रघुराज–रामचंद्र ह्यानें शबरीस पुसलें. चंचूपुटेंचि बहु टोंचिलिं पांखरांनीं. रानांत पांखरांनीं चंचूपुटें–चोंचीनें हीं फळें फार कुरतुडलीं आहेत. किंवा. नेणों दिला प्रतिफळास नखांक रानीं–प्रत्येक फळाला पांखरांनीं रानामध्यें असा नखांक म्ह० नखांचा अंक–चिन्ह दिलें आहे कीं काय हें समजत नाहीं.

**चंचूक्षतें हीं नव्हतीं दयाळा**
**मी कां तशीं आणिन हा कपाळा ॥**
**म्यां आपुल्या चावुनि शुद्ध दातें**
**चाखोनि घे मी शिवतें पदातें ॥ ५ ॥**

**टीका ॥** चंचूक्षतें हीं नव्हतीं दयाळा. हे दयावंता रामा, ह्या फळांवर हीं चंचूक्षतें म्ह० चोंचीनें पाडलेलीं क्षतें–भोकें नव्हत. मी कां तशीं आणिन हा कपाळा. अरे देवा, मी तशीं पांखरांनीं टोंचलेलीं फळें, रामा

तुला कशीं रे आणून देईन. तुला हीं अंबट लागूं नयेत म्हणून. म्यां आपुल्या चावुनि शुद्ध दांवें चाखोनि घे. माझ्या पवित्र दांतांनीं हीं फळें मीं चांगलीं चावून. चाखोनि घे—गोड किंवा अंबट ह्याची चांगली रुचि पाहून हीं फळें मीं घे म्ह० घेतलीं. हें जर रामा, तुला कदाचित् खोटें वाटेल तर. शिवतें पदातें. तुझ्याची पायांची शपत वाहतें. मग तर झालें ?

मधुरतरफळांची पूर्ण घेऊनि गोडी
मग मज रघुनाथा ठेविता होय खोडी ॥
निरखुनि रघुरायें भाव त्या भिल्लिणीचा
परम मनिं सुखावे नाथ तो जानकीचा ॥ ६ ॥

टीका ॥ मधुरतरफळांची पूर्ण घेऊनि गोडी. मधुरतर—फारच मिष्ट अशा ह्या फळांची अगोदर तूं पुरती रुचि पाहून. मग मज रघुनाथा ठेविता होय खोडी. रघुनाथा—रामचंद्रा, मग मला तूं खोडी—दोष काय तो लाव. निरखुनि रघुरायें भाव त्या भिल्लिणीचा. रघुरायें म्ह० रामचंद्रानें अशा प्रकारें त्या भिल्लिणीचा भाव म्ह० भक्ति निरखुनि म्ह० पाहून. परम मनिं सुखावे नाथ तो जानकीचा. जानकीचा नाथ—पति राम मनिं परम सुखावे म्ह० मनांत फारच संतुष्ट झाला.

भिल्ली बोलुनि बोल सुंदर असे
रामाकरीं तीं फळें
घाली नेणुनि शास्त्रषिद्ध
पुरुषां उच्छिष्ट देतां बळें ॥

**प्रेमें प्रेमभरें प्रसन्नत्हृदयें**
**भक्ता जनांचा पिता**
**आत्माराम रमापती निजमुखीं**
**झाला फळें अर्पिता ॥ ७ ॥**

**टीका ॥** भिल्ली बोलुनि बोल सुंदर असे. भिल्ली—भिल्लाची बायको ती शबरी असे सुंदर—गोड बोल म्ह० भाषणें बोलून, रामाकरीं तीं फळें घाली. शबरीनें रामाकरीं म्ह० रामाच्या हातांत तीं फळें दिलीं. परंतु कशीं दिलीं तर. शास्त्रषिद्ध पुरुषां उच्छिष्ट देतां बळें. पुरुषांला आपलें उच्छिष्ट म्ह० उष्टें, बळें—जाणूनसवरून दिलें तर ही गोष्ट शास्त्रषिद्ध म्ह० शास्त्रानें षिद्ध म्ह० निषेध केली आहे. हें नेणुनि म्ह० न समजून रामाच्या हातावर शबरीनें फळें दिलीं तेव्हां. भक्ताजनांचा म्ह० आपल्या भक्तलोकांचा जो पिता म्ह० केवळ बापच असा, आणि आत्माराम. आत्मा—जीव ह्याला आराम म्ह० विश्रांति देणारा असा, रमापति. रमा—लक्ष्मी हिचा पति—स्वामी असा जो राम ह्यानें, प्रेमें म्ह० प्रीतीनें: केवळ प्रीतिनेंच नव्हे तर, प्रेमभरें म्ह० प्रेमाचा भर—अतिशय म्ह० परम प्रीतिनें. आणि प्रसन्नत्हृदयें—संतुष्ट अंतःकरणानें. निजमुखीं झाला फळें अर्पिता. निजमुखीं—आपल्या तोंडांत शबरीनें दिलेलीं फळें आर्पिता झाला म्ह० घातलीं.

**भिल्लिच्या वनफळें मन धालें**
**लोकनायक म्हणे सुख झालें ॥**

**प्रेम रामहृदयीं बहु आलें**
**बाष्पतोय नयनांत निघालें ॥ ८ ॥**

**टीका** ॥ भिल्लिच्या वनफळें मन धालें. भिल्लि म्ह० भिल्लाची बायको शबरी हिनें दिलेल्या वनफळांनीं रामाचें मन धालें म्ह० तृप्त झालें. हें कशावरून तर. लोकनायक म्हणे सुख झालें. लोकांचा नायक–स्वामी असा रामचंद्र तो म्हणाला कीं, हीं वनफळें खाऊन मला फार संतोष झाला. प्रेम राम हृदयीं बहु आलें. तिची भक्ति पाहून रामाच्या हृदयीं–अंतःकरणांत शबरीविषयीं फार प्रेमभाव उत्पन्न झाला. तो इतका कीं, बाष्पतोय नयनांत निघालें. रामचंद्राच्या नयनांत म्ह० डोळ्यांतून बाष्पतोय म्ह० अश्रु वाहूं लागले.

**रामचंद्रविभुच्या चरणासी**
**लक्षुनी विनटली शरणासी ॥**
**वंदितां बहुसुखेंचि वधू ते**
**अश्रुनें चरणपल्लव धूते ॥ ९ ॥**

**टीका** ॥ रामचंद्र विभुच्या चरणासी लक्षुनी. विभु म्ह० समर्थ जो रामचंद्र त्याच्या चरणाकडे शबरीनें लक्षुनी म्ह० पूर्ण लक्ष लावून. विनटली शरणासी. ती रामचंद्रास शरण जाण्यास, विनटली म्ह० सिद्ध झाली. वंदितां बहु सुखेंचि वधू ते. आणि रामाच्या चरणांस ते म्ह० ती वधू–स्त्री शबरी वंदितां–नमस्कार करीत असतां. अश्रुनें चरण पल्लव धूते. चरण पल्लव म्ह० रामाचे चरण तेच पल्लव–कोमल पानें हीं

अश्रुनें म्ह० आपल्या डोळ्यांतील पाण्यानें शबरीनें धुत लीं. रामचरणीं वंदन करतांना शबरीचा कंठ सद्गदित होऊन आपल्या नेत्रांश्रूनीं रामाचे चरणांस तिनें न्हाण घातलें हा भाव.

माझें मनोगत वियोग तुझा नसावा
रूपीं तुझ्या दृढ असेन महानुभावा ॥
स्वामी म्हणे तुज वियोग कधीं न वाटे
जा शेवटीं मिळसि चिन्मयराजवाटे ॥ १० ॥

टीका ॥ माझें मनोगत वियोग तुझा नसावा. रामा, माझें मनोगत म्ह० माझा मनोरथ हा आहे कीं, तुझा मला वियोग कधीं असूंनये. रूपीं तुझ्या दृढ असेन महानुभावा. हे महानुभावा महान—मोठा आहे अनुभाव—पराक्रम ज्याचा अशा रामा, तुझ्या स्वरूपीं मीं दृढ राहावें म्ह० तुझी मूर्ति माझ्या अंतःकरणांत नेहमीं असावी अशी माझी इच्छा आहे. असें शबरीचें भाषण ऐकून. स्वामी म्हणे तुज वियोग कधीं न वाटे. स्वामी म्हणजे जगाचा पालक जो रामचंद्र तो ह्मणाला कीं, तुला माझा वियोग कधीं वाटणार नाहीं. म्ह० माझी मूर्ति तुझ्या अंतःकरणांत नेहमीं राहील. जा शेवटीं मिळसि चिन्मयराजवाटे. चिन्मय म्ह० ज्ञानमय जी राजवाट—राजरस्ता म्ह० मोक्षमार्ग ह्याला तूं शेवटीं—अंतकाळीं मिळशील. म्ह० तूं शेवटीं परब्रह्मरूपाला जाऊन मिळशील असा भाव.

---

## स्फुटकविता.

### श्लोक.

जसा वर्तता लोककल्याणकारी
जगीं वर्तती लोकही त्या प्रकारीं ॥
वदे तो सदाचार शास्त्रार्थ जैसें
जगीं वर्तती लोकही सर्व तैसे ॥ १ ॥

**टीका** ॥ जसा वर्ततो लोककल्याणकारी. लोकांचें कल्याण करणारा म्ह० सत्पुरुष ज्या रीतीनें वागतो. जगीं वर्तती लोकही त्या प्रकारीं. त्या सत्पुरुषाची चाल पाहून सर्व लोकही जगांत तसे वागतात. वदे तो सदाचार शास्त्रार्थ जैसे. तो सत्पुरुष सदाचार सत् म्ह० चांगला, आचार म्ह० वर्तणूक कोणती, तसेंच शास्त्राचा अर्थ काय हें जसें वदे म्ह० सांगतो. जगीं वर्तती लोकही सर्व तैसे. त्याप्रमाणें इतर सर्वलोकही जगांत वागतात.

सिंहाचा जो बाल तोही चपेटा
मारी त्याला जो करी मत्त मोठा ॥
तेजस्वी जे वृत्ति ऐशी तयांची
तेथें कांहीं चाड नाहीं वयाची ॥ २ ॥

**टीका** ॥ सिंहाचा जो बाळ तोही. सिंहाचा जो लहान बच्चा तो देखील. चपेटा मारी त्याला जो करी मत्त मोठा. जो करी—हत्ती मोठा असून मत्त म्ह० उन्मत्त झालेला आहे, त्या हत्तीला देखील चपेटा मारी म्ह०

चपराका मारतो. तेजस्वी जे वृत्ति ऐशी वयांची जे तेजस्वी म्ह० पराक्रमी आहेत त्यांची अशीच वृत्ति म्ह० स्वभाव असतो. तथें कांहीं चाड नाहीं वयाची. तथें म्ह० त्या स्वभावाविषयीं वयाची–फार वयाची चाड म्ह० गरज आहे असें नाहीं. ज्याच्या अंगीं मूळचाच पराक्रम आहे त्याला आपला पराक्रम दाखविण्यास मोठें-च वय पाहिजे असें नाहीं हा भाव.

न तेजस्वी साहे प्रकट परतेजोबलमदा
जयाचा जो आहे प्रकृतिगुण लोपे नच कदा ॥
मयूखांनीं जेव्हां प्रखरतर चंडांशु-तपतो
रविग्रावा तेव्हां अनलसम तेजास वमतो ॥ ३ ॥

टीका ॥ पर म्ह० दुसरा ह्यानें आपल्या तेजोबलाविष-यीं प्रकट म्ह० दाखविलेला जो मद्–गर्व त्याचें तेजस्वी म्ह० पराक्रमी पुरुषास सहन होत नाहीं, ह्यास दृष्टांत. मयूखांनीं जेव्हां प्रखर तर चंडांशु तपतो. चंडांशु. चंड म्ह० तीक्ष्ण आहेत अंशु–किरण ज्याचे असा सूर्य आपल्या मयूखांनीं म्ह० किरणांनीं जेव्हां प्रखरतर म्ह० फार कडक तपतो. रविग्रावा तेव्हां अनलसम तेजास वमतो. रविग्रावा म्ह० सूर्यकांत तेव्हां अनलसम. अनल–अग्नि त्यासम म्ह० त्यासारखें तेज वमतो म्ह० ओकतो. सूर्याचें तेज जेव्हां प्रखर होतें तेव्हां सूर्य-कांतभिंगांतून विस्तव पडतो. ह्याचें कारण, सूर्यकांत स्वतां तेजस्वी आहे, ह्मणून त्यास सूर्याचें तेज पाहव-त नाहीं हाभाव.

आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला
झाला तशांत जरि वृश्चिक दंश त्याला।
झाली तयास तदनंतर भूतबाधा
चेष्टा वदूं मग किती कपिच्या अगाधा ॥ ४ ॥

टीका ॥ आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला. अगोदरच. माकड, आणि तशांत त्यानें मद्य म्ह० दारू प्याली. झाला तशांत जरि वृश्चिकदंश त्याला. दारू पिऊन त्यांत आणखी त्याला जर वृश्चिकदंश. वृश्चिक–विंचू ह्याचा दंश–डंश झाला. म्ह० त्याला विंचू चावला. बरें इतकें ही होऊन. झाली तयास तदनंतर भूतबाधा. पुढें त्या माकडाला भूतबाधा म्ह० पिशाचाची बाधा झाली. चेष्टा वदूं मग किती कपिच्या अगाधा. कपिच्या–माकडाच्या मग अगाधा म्ह० फार अशा चेष्टा किती वदूं म्ह० किती सांगूं म्ह० मग त्या माकडचेष्टा सांगतां देखील येणार नाहींत इतक्या व्हावयाच्या.

आर्या.

उत्तम पुरुष म्हणावा
जो करितो शत्रुवरहि उपकार ॥
बहु पीडितां परांहीं
स्मरत नसे जो मनांत अपकार ॥ ५ ॥

टीका ॥ आपल्या शत्रूवरही म्ह० वैऱ्यावरही जो उपकार करितो, तो उत्तम पुरुष समजावा. बहु पीडितां परांहीं. परांहीं म्ह० दुसऱ्यांनीं त्याला पुष्कळ दुःख

दिलें तरी. स्मरत नसे जो मनांत अपकार. त्या दुःख देणाऱ्याला अपकार म्ह० पीडा मी करीन, असें जो मनांत स्मरत नसे म्ह० आणीत नाहीं तो उत्तम पुरुष होय.

हें कार्य करीन तुझें
ऐसें बोलोनि कार्य तत्काळ ॥
करणें योग्य असे बा
सुजनाची हीच कीं बरी चाल ॥ ६ ॥

टीका ॥ हें तुझें कार्य—काम करीन, असें बोलून कार्य तत्काळ करणें योग्य असे बा. बा म्ह० अरे मनुष्या, तें काम तत्काळ—त्याच वेळेस त्वां करावें हें तुला योग्य आहे. सुजनाची हीच कीं बरी चाल. कीं सुजनाची म्ह० उत्तम मनुष्याची बरी—चांगली चाल हीच म्ह० अशीच असते. म्ह० आपण बोलल्याप्रमाणें उत्तम मनुष्य त्याच वेळेस एकाद्याचें काम करतो.

बाळपणीं बाळांची
कोमल तरुतुल्य बुद्धि वांकेल ॥
घेईल ज्या गुणाला
तो गुण मति वेष्टुनीहि फांकेल ॥ ७ ॥

टीका ॥ मुलांस लहानपणींच चांगली शिक्षा लावावी अशा अभिप्रायानें कवि सांगतो. बाळपणीं बाळांची कोमल तरुतुल्य बुद्धि वांकेल. बाळांची म्ह० लहान मुलांची बुद्धि बाळपणीं वांकेल म्ह० जसा तिला कल द्यावा तिकडे ती वळेल. यास दृष्टांत. कोमल तरु-

तुल्य. कोमल—कोंवळा जो तरु—झाड त्याला कल द्यावा, तिकडे जसें तें वळतें, त्याशीं तुल्य—सारखी, लहान मुलांची बुद्धिही बाळपणीं हवी तिकडे वळवितां येईल. घेईल ज्या गुणाला तो गुण मति वेष्टुनीहि फांकेल. लहान मुलांची मति—बुद्धि ज्या गुणाला घेईल म्ह० तिला जो गुण लागेल तो गुण वेष्टुनीहि म्ह० तो गुण पूर्णपणें घेऊनही आणि ती फांकेल म्ह० त्यांची बुद्धि आणखी विस्तार पावेल.

**विद्यालयीं मुलानें**
**जाण्याचा नित्य वेळ साधावा ॥**
**मनिं नित्य वागवावें**
**कीं गुरुचा बोल मज न लागावा ॥ ८ ॥**

**टीका** ॥ विद्यालयीं—विद्या शिकण्याचें आलय म्ह० घर म्ह० शाळेंत नेमलेल्या वेळेस जाण्याचा नेहमीं वेळ मुलानें साधावा. मनीं नित्य वागवावें. आणि आपल्या मनांत नित्य असें वागवावें कीं, गुरुचा बोल मज न लागावा. कीं गुरुचा मला बोल म्ह० दोष लागूं नये.

**अभ्यासाची वेळा**
**खेळांत स्वल्पही न दवडावी ॥**
**गेली वेळा येइल,**
**पुन्हा अशी गोष्ट कधिंहि न वदावी ॥ ९ ॥**

**टीका** ॥ अभ्यास करण्याची नेमलेली वेळ मुलांनीं खेळामध्यें स्वल्पही म्ह० थोडी देखील घालवूं नये. गे-

ली वेळा येइल पुन्हा. गेलेली वेळ पुन्हा येईल, अशी गोष्ट कधींही न वदावी—बोलूं नये, कारण गेलेली वेळ पुन्हा कधीं यावयाचीच नाहीं.

**शाळेंत सोबत्यांनीं**
**खेळायाचा विचार जरि केला ॥**
**खेळुं नये आपण कीं**
**व्यर्थचि खेळांत काळ जो गेला ॥ १० ॥**

**टीका** ॥ सोबत्यांनीं शाळेंत खेळण्याचा जरी विचार केला, तरी त्यांबरोबर आपण खेळूं नये. कीं म्ह० कारण, खेळण्यांत वेळ जो गेला तो व्यर्थ गेला असें समजावें.

---

## अभंग तुकारामाचे.

**हेंचि दान दे गा देवा। तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥**
**टीका** ॥ तुकाराम देवाजवळ मागणें मागतो. गा देवा तुझें मला विस्मरण पडूं नये म्ह० तुझे चरणीं माझें नेहमीं लक्ष असावें ही मला देणगी दे.

**गुण गाईन आवडी । हेंचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥**
**टीका** ॥ तुझे गुण मी आवडी म्ह० प्रीतीनें गाईन, हेचि माझी सर्व जोडी. हीच माझी सगळी जोडी म्ह० जोड किंवा लाभ होय.

**नलगे मुक्ति धन संपदा । संतसंग देई सदा ॥ ३ ॥**

**टीका** ॥ मुक्ति म्ह० मोक्ष धन—द्रव्य तशाच संपदा—इ-

तर संपत्ति ह्यांची मला गरज नाहीं, तर संतसंग–साधूंची संगत मला सदा–नेहमीं दे ह्मणजे झालें.

**तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥**

**टीका** ॥ देवा, तुह्मी कदाचित म्हणाल कीं, तुला मोक्ष नको तर पुन्हा जन्म घेण्याकरितां गर्भवासांत पडावें लागेल तर. तुका म्हणे गर्भवासीं. तुकाराम म्हणतो कीं, देवा, तुम्ही आम्हांस गर्भवासांत सुखें म्ह० खुशाल घाला, त्याची मला चिंता नाहीं, पण तुमचे गुणानुवाद मीं गाईन असें मात्र करा म्हणजे झालें.

**जेणें होय अपकीर्ती । तें सर्वार्थीं त्यजावें ॥ १ ॥**

**टीका** ॥ जनांस उपदेश. लोकांत ज्या गोष्टीनें अपकीर्ती म्ह० दुर्लौकिक होतो, तें सर्वार्थीं म्ह० सर्व प्रकारें तुम्हीं टाकावें.

**सत्य रुचे भलेपण । तें वचन जगासी ॥ २ ॥**

**टीका** ॥ जें वचन ह्म० बोलणें सत्य–खरें असून ज्यांत भलेपण–प्रतिष्ठितपणा आहे तें बोलणें लोकांस रुचे ह्म० आवडतें.

**परद्रव्य परजाया । पाहुन वायां न भुलावें ॥ ३ ॥**

**टीका** ॥ परद्रव्य ह्म० दुसऱ्याचें द्रव्य आणि परजाया ह्म० दुसऱ्याची बायको ह्यांस पाहून वायां–व्यर्थ भुलूं नये ह्म० आपणाला मोह पडूं देऊं नये.

**तुका म्हणे खोटें वर्म । निंद्यकर्म काळिमा ॥ ४ ॥**

**टीका** ॥ तुकाराम ह्मणतो, एखाद्याचें वर्म–उणेपणा का-

ढणें हें खोटें ह्म० वाईट, तसेंच निंद्यकर्म ह्म० वाईट कर्म आणि काळिमा ह्म० आपणाला डाग लावून घेणें आहे. ह्मणून आपण कोणाचें वर्म काढूं नये. किंवा एखाद्यास सन्मार्गास लावण्याकरितां त्याचा उणेपणा काढणें हें त्यास हितकरच आहे, परंतु खोटा उणेपणा काढणें हें निंद्यकर्म आणि काळिमा आहे असाही कितीएक अर्थ करितात.

**जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥१॥**

**टीका** ॥ साधूचें लक्षण काय. जे कोणी रंजले—थकले किंवा गांजले ह्म० त्रासले त्यांस आपले जो ह्मणतो ह्म० त्यांचा समाचार घेतो तो साधु होय.

**तोचि साधु ओळखावा । देव तेथेंची जाणावा ॥ २ ॥**

**टीका** ॥ वर सांगितल्याप्रमाणें ज्याची वर्तणूक आहे, त्यालाच साधु असें ह्मणावें. आणि त्या मनुष्यांतच देव आहे असें समजावें.

**ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥३॥**

**टीका** ॥ ज्या कोणाला आपंगिता ह्म० सांभाळ करणारा कोणी नाहीं, त्याला जो आपल्या पोटाशीं धरितो ह्म० त्याचें समाधान करून त्याचा आपण सांभाळ करतो तो साधु.

**दया करिजे पुत्रासी । तेच दासा आणि दासी ॥ ४ ॥**

**टीका** ॥ आपल्या मुलावर जी दया, तीच आपले दास आणि दासी ह्यांवरही जो करितो तोच साधु.

**तुका म्हणे सांगों किती। तोचि भगवंताची मूर्ती॥५॥**

**टीका ॥** तुकाराम ह्मणतो, अशा मनुष्याचा मोठेपणा मी किती वर्णूं. तर मी इतकेंच सांगतों कीं, तोचि भगवंताची मूर्ती ह्म० तो साक्षात भगवंताचीच मूर्ति होय ह्म० तो आणि देव यांत भेद नाहीं.

**परद्रव्य परनारी। अभिलाषूनि नाक धरी॥ १ ॥**

**टीका ॥** ढोंगी साधूचीं लक्षणें. परद्रव्य ह्म० दुसऱ्याचें द्रव्य आणि परनारी ह्म० दुसऱ्याची स्त्री ह्यांतें अभिलाषूनि ह्म० ह्यांवर इच्छा ठेवून, जो नाक धरी—प्राणवायु कोंडून धरितो ह्म० समाधि लावतो. असा जो तो ढोंगी साधु होय. ह्या दोहोंवर अभिलाषबुद्धि ठेवून जो स्नानसंध्या करतो त्याची सर्व तपश्चर्या फुकट आहे हें तात्पर्य.

**जळो तयाचा आचार। व्यर्थ भार वाहे खर॥ २ ॥**

**टीका ॥** अशा मनुष्याच्या आचारास म्ह० धर्मनिष्ठपणास आग लागो. जसा खर म्ह० गाढव भार मात्र वाहतो, पण पाठीवरच्या जिनसाची कधींच त्याला रुचि ठाऊक नसते, तसा त्या मनुष्याचा आचार व्यर्थ होय.

**सोंवळ्याची करी स्फीती। क्रोधें विटाळला चित्तीं॥३॥**

**टीका ॥** आपल्या सोंवळ्याची स्फीती म्ह० प्रतिष्ठा बाहेरून दाखवितो, पण क्रोधें विटाळला चित्तीं. आपल्या अंतःकरणांत क्रोधें म्ह० रागानें विटाळला आहे म्ह० अंतःकरणाला जर क्रोधाचा विटाळ आहे, तर बाहेरील सोंवळ्याचा उपयोग तो कोणता ? हाभाव.

**तुका म्हणे सारीं सोंगें । दावी बाहेरील आंगें ॥ ४ ॥**
**टीका** ॥ तुकाराम म्हणतो. भस्म लावून व रुद्राक्षधारण वगैरे करून बाहेरल्या आंगांनीं साधूचीं सोंगें मात्र दाखविणारा असा वर सांगितलेला मनुष्य होय. तो खरा साधु नव्हे.

**नीचपण बरवें देवा । नचले कोणाचाही हेवा ॥ १ ॥**
**टीका** ॥ लहानपण चांगलें अशाविषयीं. हे देवा, नीचपण— म्ह० लहानपण मला दे. कारण कीं, तें असलें म्हणजे कोणाचाही हेवा—द्वेष उत्पन्न होत नाहीं.

**महापुरें झाडें जाती । तेथें लोहाळे वांचती ॥ २ ॥**
**टीका** ॥ वर सांगितलेल्यास दृष्टांत. महापुरें—मोठा पूर आला ह्मणजे मोठमोठीं झाडें मुळासकट उपटून वहात जातात. पण त्याच जाग्यावर लोहाळ्यांचीं फार लहान झाडें असतात तीं तशींच कायम राहतात. लहानपणाचें असें फळ आहे.

**येती सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती दुरी ॥ ३ ॥**
**टीका** ॥ तसेंच सिंधूच्या म्ह० समुद्राच्या लहरी—लाटा जेव्हां येतात, तेव्हां आपण नम्र• म्ह० खालीं मान केली असतां त्या लाटांपासून आपणास कांहीं इजा न होतां त्या दूर जातात.

**तुका म्हणे हेंचि फळ ।**
**पाय धरल्या नचले बळ ॥ ४ ॥**

**टीका** ॥ तुकाराम म्हणतो, कोणाचेही पाय धरले म्हणजे तो बळकट असला तरी त्याचें बळ—शक्ति चालत नाहीं हेंच पाय धरल्याचें फळ आहे.

**लहानपण देगा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥ १ ॥**

**टीका ॥** हे देवा, म्हणून मला लहानपण दे, लहान असण्यांतच सुख आहे, पहा, मुंगी साखरेचा रवा. मुंगी लहान असते म्हणून मुंगी म्ह० मुंगीला साखरेचा रवा म्ह० कण खावयास मिळतो.

**ऐरावती रत्न थोर । त्यासि अंकुशाचा मार ॥ २ ॥**

**टीका ॥** देवा, तुम्ही म्हणाल कीं, लहानाला सुख असतें तसेंच थोरालाही असतें, पण नाहीं. ऐरावती रत्न थोर. ऐरावती म्ह० इंद्राचा हत्ती चौदा रत्नांतील एक मोठेंच रत्न होय, परंतु त्याच्या कपाळीं अंकुशाचा मार आहे.

**ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठीण ॥ ३ ॥**

**टीका ॥** म्हणून ज्याच्या अंगीं मोठेपण असतें, तया म्ह० त्याला कठीण यातना म्ह० दुःख भोगावीं लागतात.

**तुका म्हणे बरवें जाण ।**
**व्हावें लहानाहुन लहान ॥ ४ ॥**

**टीका ॥** याकरितां तुकाराम म्हणतो. लाहानाहूनही आपण लहान व्हावें हें बरवें म्ह० चांगलें असें जाण.

---

## अभंग तुकारामाचे.

**मुख्य ते पाहिजे गळाली अहंता ।**
**उपदेश घेतां सुख वाटे ॥ १ ॥**

**टीका ॥** मुख्यत्वेंकरून मनुष्याची अहंता म्ह० अहंकार किंवा मीपणा नाहींसा झाला पाहिजे, मीपणा एकदा

गेला म्हणजे मग उपदेश घेतां सुख वाटे. गुरूनें दिलेला जो उपदेश तो त्याच्या मनावर चांगला ठसून त्यापासून जें काय सुख आहे तें त्याच्या अनुभवास येतें.

व्यर्थ भराभर केलें पाठांतर ।
जों वरी अंतर शुद्ध नाहीं ॥ २ ॥

**टीका** ॥ भगवद्गीता, भागवत इत्यादिक मोठमोठे ईश्वरपर ग्रंथ ह्यांचें भराभर पाठांतर ह्म० पठण केलें आणि अंतर ह्म० आपलें अंतःकरण जर शुद्ध नसलें तर तें पाठांतर सर्व व्यर्थ आहे.

घोडें काय थोडें वागवीतें ओझें ।
भावावीण वांझें पाठांतर ॥ ३ ॥

**टीका** ॥ घोड्याच्या पाठीवर हजारों रुपायांची रोकड किंवा पुष्कळ उंचा माल असतो, असें ओझें घोडें काय थोडें वाहत असतें ? परंतु पाठीवर वाहिलेल्या पदार्थापासून जें सुख आहे, त्याचा अनुभव जसा त्या घोड्याला तिळभरही नाहीं तसें. भावावीण वांझें पाठांतर. भावावीण—भक्तीवांचून जें पठण करणें तें वांझें ह्म० निष्फळ होय.

तुका म्हणे धरा निष्ठावंत भाव ।
जरी तुम्हां देव पाहिजे तो ॥ ४ ॥

**टीका** ॥ ह्मणून तुह्मांस जर तो देव पाहिजे तर, तुकाराम ह्मणतो, तुह्मी निष्ठावंत ह्म० दृढनिश्चयाचा असा भाव—भक्ति धरा.

**आपुलियाबळें नाहीं बोलवत ।**
**सखा भगवंत वाचा त्याची ॥ १ ॥**

**टीका** ॥ आपण बोलतों हें आपुलियाबळें ह्म० आपल्या शक्तीनें बोलत नाहीं. तर. सखा भगवंत वाचा त्याची. सखा—हितकर्ता जो भगवान त्याची ही वाचा—वाणी आहे ह्म० आपण स्वशक्तीनें बोलत नाहीं, तर त्यानें आपणास बोलण्याची जी शक्ति दिली आहे त्या शक्तीनें बोलतों.

**साळुंकी मंजूळ बोलतसे वाणी ।**
**शिकविता धणी वेगळाची ॥ २ ॥**

**टीका** ॥ साळुंकी मंजूळ शब्द करिते. पण तिला शिकविणारा धणी—मालक वेगळाच आहे तो कोण? तर ईश्वर.

**काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें ।**
**परी विश्वंभरें बोलवीलें ॥ ३ ॥**

**टीका** ॥ पामर—यःकश्चित् अनाथ जो मी या माझ्यानें उत्तरें ह्म० भाषणें काय बोलवायाचीं आहेत. माझी शक्ति ती किती. परी—परंतु विश्वंभर—जागाचा पोष-णकरणारा जो भगवान् त्यानें मजकडून बोलविलें म्हणून मी बोललों.

**तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा ।**
**वागवी पांगुळा पायांवीण ॥ ४ ॥**

**टीका** ॥ तुकाराम म्हणतो, त्या भगवंताची कळा म्ह० चातुर्य कोणास समजतें? कोणालाच समजत नाहीं.

चागवी पांगुळा पायांवीण. पांगळ्या मनुष्यास पायींवां-चून देखील जो चालवितो. असें त्याचें विलक्षण चातुर्य आहे.

**नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥ १ ॥**

**टीका** ॥ ईश्वरप्राप्तीकरितां कोणतेंही साधन भक्तीवांचून केलेलें व्यर्थ आहे, असें प्रतिपादीत होत्साता तुकाराम म्हणतो, मळ काढण्याचा गुण साबणाच्या अंगीं आहे खरा, पण जीवन म्ह० पाणी जर मुळचें निर्मळ–स्वच्छ नाहीं, गढूळ आहे तर तेथें साबण काय करील.

**वंध्ये न होती लेंकुरें । काय कीजे त्या भ्रतारें ॥२॥**

**टीका** ॥ वंध्ये म्ह० वांझ बायकोला मुलें होत नाहींत, तर. काय कीजे त्या भ्रतारें. म्ह० त्या नवऱ्यानें काय कीजे–काय करावें.

**वृक्ष नेदी फळ । काय करी वसंतकाळ ॥ ३ ॥**

**टीका** ॥ वृक्ष–झाड मुळींच जर फळ नेदी ह्म० देत नाहीं तर, वसंतऋतूनें तेथें काय करावें. ह्म० वसंत ऋतूंत झाडांस फळें येतात, पण ज्या झाडाला मुळींच फळ नाहीं, त्याला त्या ऋतूंत तरी फळें कोठून येतील? येणारच नाहींत.

**तुका म्हणे भक्तीवीण । फळ कांहीं नाहीं जाण ॥४॥**

**टीका** ॥ ह्मणून तुकाराम ह्मणतो, वर सांगितल्याप्रमाणें भक्तिवीण–भक्तीवांचून ईश्वरप्राप्तीकरितां कांहीं केलें तरी फळ प्राप्त होणार नाहीं. असें हें तूं जाण–समज.

**भावें गावें गीत । शुद्ध करोनियां चित्त ॥ १ ॥**

**टीका** ॥ भावें–भक्तीनें भगवंताचे गीत ह्म० गुण आपण

गावे, ते कसे गावे तर. शुद्ध करोनियां चित्त. आपलें चित्त—अंतःकरण शुद्ध—निष्कपट करून ह्म० अंतःकरण पूर्वक.

**जरी व्हावा तुज देव । तरि हा सुलभ उपाव ॥२॥**
**टीका** ॥ जर तुला देव पाहिजे, तर हा पुढें सांगितलेला उपाव—उपाय सुलभ—सोपा आहे.

**करीं मस्तक ठेंगणा । लागें संतांचिया चरणा ॥३॥**
**टीका** ॥ तो कोणता उपाय तर. करीं मस्तक ठेंगणा. आपलें मस्तक ठेंगणें कर ह्म० नम्र कर. आणि साधूंचे पाय धर.

**आणिकाचे कानीं । गुणदोष मना नाणीं ॥ ४ ॥**
**टीका** ॥ आणीकाचे ह्म० इतर लोकांचे गुणदोष कानीं ह्म० कानांनीं आपल्या मना—मनांत आणूं नको. ह्म० इतरांचे गुणदोष ऐकून ते आपल्या मनांत तूं आणूं नको असा भाव.

**तुका म्हणे फार । थोडा करीं उपकार ॥ ५ ॥**
**टीका** ॥ तुकाराम ह्मणतो. थोडा फार ह्म० थोडा बहुत तूं लोकांवर उपकार करीत जा. किंवा लोकांनीं केलेला जो तुजवर थोडाही उपकार तो तूं फार कर ह्म० पुष्कळ आहे असें समज, असाही कित्येक अर्थ करितात.
**देव वसे ज्याचे चित्तीं । त्याची धरावी संगती ॥ १ ॥**
**टीका** ॥ ज्याचे चित्तीं ह्म० अंतःकरणांत देव वसे ह्म० राहतो, त्याची संगती म्ह० समागम आपण धरावा.
**ऐसें आवडतें मना । देवा पुरवावी वासना ॥ २ ॥**
**टीका** ॥ तुकाराम म्हणतो, असें माझ्या मनाला

आवडतें. ही, माझी वासना म्ह० इच्छा, देवा, तुह्म पुरवावी म्ह० पूर्ण करावी.

**होवो संत जना भेटी । नहो अंगसंगतुटी ॥ ३ ॥**

**टीका ॥** साधुजनांची भेट मला व्हावी. आणि नहो अंगसंगतुटी— अंगसंग म्ह० साधूंच्या अंगाचा सं ह्याची तुटी म्ह० तुटणें म्ह० साधूंची संगत सुटणें मला असूनये. नेहमीं मला सत्संग असावा हा भाव.

**तुका म्हणे जिणें । बरवें संतसंघट्टणें ॥ ४ ॥**

**टीका ॥** तुकाराम म्हणतो. आपलें जिणें म्ह० वांच बरवें म्ह० उत्तम कशानें तर, संतसंघट्टणें संत म्ह० सा ह्यांच्या संघट्टणें म्ह० संगतीनें.

**होंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥ १**

**टीका ॥** ज्याचे अंतःकरणीं सदा—नेहमीं समाधान म्ह० संतोष असतो, तसा समाधानी पुरुष दृष्टीस पडला असत देवाचें दर्शन झालें असें समजावें, म्ह० ज्याचें मन नेहमीं संतुष्ट तो साक्षात् ईश्वरच होय, असा भाव.

**माना अपमानाचें गोवें । अवघें गुंडाळुनि ठेवावें ॥२॥**

**टीका ॥** मान म्ह० प्रतिष्ठा अपमान म्ह० अप्रतिष्ठा ह्यांचें गोवें म्ह० गांठोडें हें आपण सगळें गुंडाळून ठेवावें म्ह० मान झाला म्हणून सुख आणि अपमान झाला म्हणून दुःख हीं कधीं मानूं नयेत, आपणास दोन्ही सार खींच असावीं हें तात्पर्य.

**सदा शांती राहे वस्ती । तेथें खुंटे काळगती ॥ ३ ॥**

**टीका ॥** ज्याचे अंतःकरणांत सदा—नेहमीं शांती म्ह० समाधान वस्तीस राहते म्ह० ज्याच्या अंतःकरणांत शां

ति आहे, तेथें काळाची गति खुंटते म्ह० चालत नाहीं, त्या मनुष्यावर काळाचा अंमल नाहीं हा भाव.

**तुका म्हणे थोडें आहे। आली ऊर्मी साहुनि राहे ॥ ४ ॥**

टीका ॥ तुकाराम म्हणतो, मर्माची गोष्ट ध्यानांत ठेवण्याची थोडकी आहे, ती कोणती तर, आली ऊर्मी साहुनि राहे. समुद्राची ऊर्मी म्ह० लहरी आपणावर येऊं लागली म्हणजे नम्र होऊन तिचें सहन करून तूं राहा म्हणजे झालें. दुःखाचा लोंढा तुजवर येऊं लागला म्हणजे विचार करून निमुटपणीं त्याचें सहन कर म्हणजे दुःखापासून तुला कांहीं बाधा नाहीं हें तात्पर्य.

---

## दुःशासन वध.

### आर्या.

**धांवति अन्योन्यावरि ते दोघे आठवूनि अपकार ॥**
**जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत दंपतीच अपकार ॥ १ ॥**

टीका ॥ भीम व दुःशासन यांचें घोर युद्ध झालें तेव्हांच्या प्रसंगाचें कवि वर्णन करितो. धांवति अन्योन्यावरि ते दोघे आठवूनि अपकार. भीमदुःशासनांनीं परस्परांस पूर्वीं केलेले अपकार म्ह० दिलेलीं दुःखें आठवून ते दोघे अन्योन्यावरि म्ह० एकमेकावर धांवले. ते कसे धांवले. तर कवि म्हणतो. जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत. दंपतीच अपकार. मदमत्त, मद म्ह० गर्व यानें उन्मत्त झालेले आणि क्रोधोद्धत. क्रोध म्ह० राग यानें उद्धत म्ह० खवळलेले असे जे अपकार दंप-

ती. अपकार, अ म्ह० नाहीं पकार म्ह० प अक्ष ज्यांत असे दंपती. म्ह० दंपती ह्या शब्दांतील पका काढला असतां दंती असा शब्द राहतो; आणि दंत ह्याचा अर्थ हत्ती असा आहे म्हणून कवि म्हणतो, भी आणि दुःशासन हे जाणों अपकार दंपती म्ह० हत्तीं एकमेकांवर धांवून येत कीं काय असें वाटे.

दुःशासनशर मर्मीं
लागे नागेशसा असुखरचिता॥
मूर्छित करि भीमातें
इतरांचे तो पळें असु खरचिता ॥ २ ॥

टीका ॥ दुःशासनशर मर्मीं लागे. दुःशासनशर दुःशासनाचा शर म्ह० बाण भीमाच्या मर्मावर लागला तो बाण भीमाला कसा लागला तर. नागेशसा असुख रचिता. नाग—सर्प ह्यांमध्यें ईश म्ह० श्रेष्ठ म्ह० मोठ सर्प, जसा मर्मावर डंश करून असुख—दुःख, रचित म्ह० देणारा होतो, तसा तो बाण भीमाला लागून दुःख झालें. मूर्छित करि भीमातें. आणि त्या बाणामुळें भी माला मूर्छा आली. भीम इतका बलाढ्य असून त्या ची अशी अवस्था झाली. मग दुसऱ्यांची तर काय कथा. इतरांचे तो पळें असु खरचिता. भीमावांचून जे इतर म्ह० दुसरे शूर ह्यांचे असु म्ह० प्राण ह्यांच पळें म्ह० एका पळांत खरचिता म्ह० नाश करून टा कणारा असा तो बाण झाला असता. म्ह० त्या बाणानें इतर शूर एका पळांत गतप्राण झाले असते.

**सावध होउनि भीम**
**क्षिप्र महाशक्ति शत्रुवरि सोडी ॥**
**तीसहि तो दुःशासन**
**दश बाणांहीं पराक्रमें तोडी ॥ ३ ॥**

**टीका ॥** सावध होउनि भीम क्षिप्र. भीम म्हा नंतर क्षिप्र म्ह० लौकरच सावध होऊन. महाशक्ति शत्रुवरि सोडी. त्याणें शत्रुवरि म्ह० दुःशासनावर महाशक्ति म्ह० मोठी शक्ति सोडली. तीसही तो दुःशासन दश बाणांहीं पराक्रमें तोडी. ती महाशक्ति देखील दुःशासनानें दश बाणांहीं म्ह० दाहा बाणांनीं मोठ्या पराक्रमानें तोडून टाकिली.

**तेव्हां गदाप्रहारें**
**भीम ललाटीं स्वशत्रुला ताडी ॥**
**क्षितिवरि हरिवज्राहत**
**गिरिशिखर जसें तसें तया पाडी ॥ ४ ॥**

**टीका ॥** तेव्हां गदाप्रहारें भीम ललाटीं स्वशत्रुला ताडी. भीमाची महाशक्ति दुःशासनानें तोडल्यावर भीमानें शत्रु जो दुःशासन ह्याच्या ललाटीं म्ह० कपाळावर, आपल्या गदेचा प्रहार म्ह० ताडन म्ह० भीमानें आपली गदा त्याला मारली. ती गदा लागतांक्षणींच. क्षितिवरि हरिवज्राहत गिरिशिखर जसें. हरिवज्राहत. हरि म्ह० इंद्र याच्या वज्रानें, आहत म्ह० ताडित जें गिरिशिखर. गिरि म्ह० पर्वत ह्याचें शिखर क्षितिवरि— पृथ्वीवर जसें पडतें. इंद्राचें वज्र लागून पर्वताचें शिखर जसें खालीं पडतें,

तसें तया पाडी. त्याप्रमाणें भीमसेनानें आपली गदा मारून दुःशासनाला पृथ्वीवर पाडिलें.

पत्नीचा केशग्रह-
समय स्मरला निजप्रतिज्ञा ते ॥
आठवि म्हणे म्हणोत न
मिथ्यावादी मजप्रति ज्ञाते ॥ ५ ॥

टीका ॥ पत्नीचा केशग्रह समय स्मरला निजप्रतिज्ञा ते पत्नी म्ह० द्रौपदी हिचे केशांचाग्रह म्ह० धरणें म्ह० दुःशासनानें द्रौपदीची वेणी ओढून त्यानें तीस सभेंत आणिलें होतें, तो समय स्मरला म्ह० त्यावेळेची भीमास आठवण झाली. आणि ते म्ह० ती निजप्रतिज्ञा आठवी. निज म्ह० आपली जी प्रतिज्ञा कीं, मी दुःशासनाला मारून त्याचें रक्त पिईन. ह्या प्रतिज्ञेचीही त्यास आठवण झाली. आणि भीम म्हणे. आणि भीम म्हणाला. म्हणोत न मिथ्यावादी मजप्राति ज्ञाते. ह्यावेळेस ती प्रतिज्ञा मी खरी न केली तर ज्ञाते म्ह० शाहणे लोक मजप्राति—मला मिथ्यावादी. मिथ्या म्ह० खोटें वादी म्ह० बोलणारा असा न म्हणोत. म्हणून ह्या वेळेस दुःशानाचा वध केलाच पाहिजे हा भीमाच्या बोलण्याचा भाव.

वृषनृपकृपकृतवर्म-
द्रोणसुतातें म्हणे अहो परिसा ॥
दुःशासनास वधितों
मी भीम गजासि धोपला हरिसा ॥ ६ ॥

टीका ॥ वृषनृपकृपकृतवर्मद्रोणसुतातें म्हणे. वृष म्ह०

कर्ण, नृप म्ह० राजा दुर्योधन, कृप म्हणजे कृपाचार्य, कृतवर्मा, द्रोणसुत. द्रोणाचा सुत—पुत्र अश्वत्थामा, ह्या सर्वांस भीम म्हणाला. अहो परिसा. अहो सर्व तुम्ही मी बोलतों हें परिसा म्ह० ऐका. दुःशासनास वधितों मी भीम. दुःशासनाला मी भीम वधितों म्ह० मारितों. यास दृष्टांत. गजासि घोपला हरिसा. घोपला म्ह० तान्हेलेला हरि म्ह० सिंह जसा गजासि म्ह० हत्तीस मारून त्याचें रक्त पितो, आणि आपली तहान भागवितो, तसा आज मी दुःशासनास मारून त्याच्या रक्ताचें प्राशन करितों.

**शक्ति असेल तरि तुम्ही रक्षा मी आपुली प्रतिज्ञा ती।**
**संरक्षितों कराया स्वर्गीं संतृप्त संप्रति ज्ञाती ॥ ७ ॥**

**टीका** ॥ शक्ति असेल तरि तुह्मी रक्षा. तुम्हांत जर शक्ति असेल तर आज दुःशासनाला तुम्ही रक्षा म्ह० त्याचें संरक्षण करा. मी आपली प्रतिज्ञा ती संरक्षितों. दुःशासनाला मारण्याविषयीं जी मी प्रतिज्ञा केली आहे, ती मी आपली प्रतिज्ञा संरक्षितों म्ह० खरी करितों; कशाकरितां तर. कराया स्वर्गीं संतृप्त संप्रति ज्ञाती. माझी स्वर्गलोकीं जी ज्ञाती म्ह० वाडवडील आहेत त्यांस संप्रति म्ह० ह्यावेळेस संतृप्त म्ह० संतुष्ट कराया म्ह० करण्याकरितां मी आपली प्रतिज्ञा खरी करितों.

**ऐसें गर्जोनि उडी**
**टाकी स्वरथावरूनि कलितासी।**

**तो भीम भीमकर्मा**
**गांठी त्या रिपुसि भूमिगलितासी ॥ ८ ॥**

**टीका** ॥ ऐसें गर्जोनि उडी टाकी स्वरथावरूनि का
तासी. भीमसेन असें वर सांगितल्याप्रमाणें गर्ज
म्ह० मोठ्यामें ओरडून आणि. कलितासी कलित म्ह
हातीं घेतला आहे असि म्ह० खड्ग ज्यानें असा भी
ज्यानें स्वरथावरूनि म्ह० आपल्या रथावरून खालीं उ
टाकिली. तो भीम भीमकर्मा. भीम–भयंकर कर्म
पराक्रम ज्याचा असा भीमसेन. गांठी त्या रिपुसि भू
गलितासी. भूमीवर गलित म्ह० निश्शक्त पडले
रिपु–शत्रु दुःशासन त्यास गांठी म्ह० त्याजवळ आल

**गरुड जसा गगनांतुनि**
**वेगें उतरोनि पन्नगा झडपी ।**
**तैसा भीम बळानें**
**दुःशासनकंठ अंघ्रिनें दडपी ॥ ९ ॥**

**टीका** ॥ गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि. गरु
गगनांतुनि म्ह० आकाशांतून वेगें–मोठ्या आवशानें
तरून असा पन्नगा–सर्पावर झडप घालतो. तै
भीम बळानें दुःशासनकंठ अंघ्रिनें दडपी. दुःशासन
च्या कंठ भीमसेनानें तसा मोठ्या जोरानें आपल्या अंघ्रि
म्ह० पायानें दडपला.

**भीम विदारी खड्गें**
**सहजपरमकाठिण्य शत्रुचें उरतें ।**

वाटे पविपातींही
त्या साध्वीला न गांजितां उरतें ॥ १० ॥

टीका ॥ भीम विदारी खड्ग सहज परमकठिण शत्रुचें उरतें. सहजपरमकठिण म्ह० स्वाभाविक फारच कठोर असें शत्रूचें—दुःशासनाचें तें उर म्ह० त्दृदय भीमसेनानें खड्ग—तरवारीनें विदारी म्ह० फोडलें. वाटे पविपातींही त्या साध्वीला न गांजितां उरतें, कवि म्हणतो मला असें वाटतें, कीं त्या साध्वीला म्ह० त्या महापतिव्रता द्रौपदीला जर दुःशासनानें गांजलें नसतें, तर पविपातींही. पवि म्ह० वज्र ह्याचा पात—पडणें म्ह० दुःशासनाच्या त्दृदयावर वज्र पडलें असतें तरी उरतें म्ह० वज्रापुढेंही तें ऊर टिकलें असतें. परंतु दुःशासनानें द्रौपदीचा फारच छळ केला म्हणून त्याच्या त्दृदयाची अशी अवस्था झाली हें तात्पर्य.

अशनिहत शिळातळ जळ
रक्त तसें खड्गभग्न तें उर वी ॥
तृषित घटोत्कचतात
प्राशी शोणित न लेशही उरवी ॥ ११ ॥

टीका ॥ अशनिहत शिळातळजळ. अशनि म्ह० वज्र त्यानें हत—ताडित म्ह० ज्यावर वज्र पडलें आहे असें शिळातळ—पाषाणाचें बूड त्यापासून जसें जळ—पाणी निघतें. रक्त तसें खड्गभग्न तें उर वी. खड्गभग्न भीमाच्या खड्गानें—तरवारीनें भग्न म्ह० फुटलेलें असें तें दुःशासनाचें ऊर रक्त तसें वी म्ह० विऊं लागलें, म्ह० त्यांतून रक्त

ओंजळीभर घेऊन तो डोलूं लागला. मिटक्या देउनि पाहुनि कर्णसुयोधनमुखांकडे बोले. आणि मिटक्या मारून कर्ण आणि सुयोधन म्ह० दुर्योधनप्रमुखांकडे पाहून बोलूं लागला.

पीतों हें रक्त तुझें
हांसत होतासि मज जसा भणगा।
दुःशासना तसा तूं
पुनरपि गोंगौंः स्वआननें म्हण गा॥ १९॥

**टीका**॥ पीतों हें रक्त तुझें हांसत होतासि मज जसा भणगा. अरे दुःशासना, हें तुझें मी आतां रक्त पितों अरे जसा एखादा भणगा— भिकारी त्यास जसें हंसावें तसा तूं मला मागें हंसत होतास आणि पांडव अनाथ गाई रे गाई असें म्हणून तूं आम्हांस हिणवीत होतास दुःशासना तसा तूं पुनरपि गोंगौंः स्वआननें म्हण गा रे दुःशासना, तसा म्ह० अनाथ भिकारी तो तूंच आतां स्वआननें म्ह० आपल्याच तोंडानें पुनरपि—पुन्हा गोंगौंः गाय रे गाय मी, असें आपल्याला म्हणून घे.

काय करूं काळानें
अभय दिलें घेतलासि तूं पदरीं।
दुःशासना कुळक्षय
मूळा त्राता दुजा तुला न दरीं॥ २०॥

**टीका**॥ काय करूं काळानें अभय दिलें घेतलासि तूं पदरीं. काळानें—मृत्यूनें अभयवचन देऊन तुला त्या

नें आपल्या पदरांत घेतलें म्ह० तूं मृत्यूच्या स्वाधीन झालास, मी काय करूं. दुःशासना कूळक्षयमूळा त्राता दुजा तुला न दरीं. आपल्या कुळाचा क्षय—नाश करण्यास तूं मूळ म्ह० कारण अशा दुःशासना, इतके तुझे आप्त आणि भाऊ आहेत, परंतु त्यांतून तुला दरीं म्ह० ह्या संकटांत दुसरा कोणी त्राता—राखणारा नाहीं. तर अशी तुझी स्थिति पाहून मला वाईट रे वाटतें असा भीमाच्या बोलण्याचा भाव.

**ऐसें बोलत हांसत**
**शत्रुरुधिरदिग्धपाणिमुख विकट।**
**प्रकट महा भैरवसा**
**नाचत गेला जयाच्युतानिकट ॥ २१ ॥**

**टीका** ॥ ऐसें बोलत हांसत शत्रुरुधिरदिग्धपाणिमुख विकट. ऐसें म्ह० वर सांगितल्याप्रमाणें बोलत, हांसत तो भीमसेन शत्रूचें रुधिर—रक्त त्यानें दिग्ध म्ह० भरलेले आहेत पाणि म्ह० हात आणि मुख म्ह० तोंड ज्याचें असा तो त्यावेळेस कसा दिसूं लागला तर विकट— भयंकर, प्रकट महाभैरवसा. तो महा भैरवच प्रगट झाला कीं काय असा तो भीम, नाचत गेला जयाच्युतानिकट. दुःशासन मारल्यानंतर जय म्ह० अर्जुन आणि अच्युत म्ह० श्रीकृष्ण ह्यांकडे धांवत गेला.

---

# सुभाषित कविता.

## पृथ्वीविषयीं.

फिरे अंतरिक्षीं सदा जेंवि पक्षी
न कांहींच लक्षी न कांहींच भक्षी ।
जयाला विसांवा कधींही नसावा
मुला सांग रे कोण ऐसा असावा ॥ १ ॥

**टीका** ॥ फिरे अंतरिक्षीं सदा जेंवि पक्षी. जो पदार्थ अंतरिक्षीं म्ह० आकाशांत सदा म्ह० नेहमीं फिरत असतो. कसा फिरतो तर. जेंवि—जसा पक्षी—पांखरूं आकाशांत फिरतें तसा. न कांहींच लक्षी न कांहींच भक्षी. आणखी जो पदार्थ कांहींच, न लक्षी म्ह० पहात नाहीं, आणि न कांहींच भक्षी. आणि कांहीं खात नाहीं म्ह० फिरणारा असून ज्या पदार्थाला डोळे नाहींत आणि तोंडही नाहीं. जयाला विसांवा कधींही नसावा. ज्याला कधीं विसांवा म्ह० विश्रांति नाहीं म्ह० जो कधीं फिरतांना थांबत नाहीं. मुला सांग रे कोण ऐसा असावा. अरे मुला, असा पदार्थ कोणता ? तो तूं सांग बरें ! असा पदार्थ पृथ्वी होय कारण, जी नेहमीं आकाशांत पांखराप्रमाणें फिरते, जी कांहीं पहत नाहीं व खात नाहीं. जिला कधीं विसांवाही नाहीं.

चक्रापरी भू फिरते सदा ही
तरी न कोणी पडती कदाही ।

तिच्यांत आकर्षणशक्ति आहे
म्हणून पृष्ठावर सर्व राहे ॥ २ ॥

टीका ॥ चक्रापरी भू फिरते सदा ही. ही भू– म्ह० पृथ्वी सदा म्ह० सर्वकाळ चक्रापरी–चाका प्रमाणें फिरते. तरी न कोणी पडती कदाही–असें असतां ह्या पृथ्वीवर राहणारा कोणताही पदार्थ कदाही म्ह० कधींही पडत नाहीं. कारण कीं, हिच्यांत आकर्षण शक्ति आहे. ह्या पृथ्वींत आकर्षणशक्ति–पदार्थ ओढून धरण्याची शक्ति आहे. म्हणून पृष्ठावर सर्व राहे. याकरितां हिच्या पृष्ठावर म्ह० पाठीवर सर्व राहे म्ह० सगळे पदार्थ चिकटून राहतात.

---

उत्प्रेक्षा.

न हें नभोमंडल वारिराशी
न तारका फेंसचि हा तयाशी ।
न चंद्र हा नावचि चालताहे
न अंक तो तीवर शीड आहे ॥ ३ ॥

उत्प्रेक्षा म्हणून भाषेतील एक अलंकार आहे; दोन पदार्थांत कांहीं गोष्टी सारख्या जेथें आढळतात, तेथें कवि एका पदार्थावर दुसऱ्याचा आरोप करितो म्ह० तोच हा पदार्थ आहे असें कवि ह्मणतो त्यास उत्प्रेक्षा अलंकार असें नांव ग्रंथ कर्त्यांनीं दिलें आहे. ह्याचीं पुढें उदाहरणें दिलीं आहेत. एके दिवशीं रात्रीं आकाशाकडे पाहून त्यावर कवि कल्पना करितो,

टीका ॥ न हें नभोमंडल. नभ—आकाश ह्याचें मंड-ळ हें नव्हे, तर वारिराशी. वारि—उदक ह्याचा राशी ह्म० समूहच हें आकाश आहे. आकाशच समुद्र ह्मटला, तेव्हां समुद्राचें सादृश्य आकाशाला कांहीं गोष्टींनीं अवश्य असलें पाहिजे, तें असें कीं, नैं तारका फेंसचि हा तयाशी. आकाशांतल्या तारका ह्म० नक्षत्रें हाच त्या समुद्रावरचा फेंस होय. न चंद्र हा नाव चि चालताहे. हा चंद्र चालत नाहीं, तर त्या समुद्रावर ही एक नाव ह्म० तारूच चालत आहे, ह्या तारवावरील शीड कोणतें तर. न अंक तो तीवर शीड आहे. चंद्रांत जो कलंक दिसतो त्याला अंक अशी संज्ञा आहे, ह्मणून तो अंक म्ह० चंद्रांत जो क-लंक आहे, तो कलंक नव्हे, तर तो काळेपणा त्या गल-बतावरील शीड म्ह० अवजारच आहे.

संताप दे यास्तव चंद्र नोहे
रवी म्हणावा तरि रात्र आहे ।
हा सागरांतून निघोन गेला
आकाशमार्गी वडवाग्नि ठेला ॥ ४ ॥

टीका ॥ कोणी पुरुष स्त्रीवियोगामुळें संतप्त होऊन थंड होण्याकरितां चांदण्यांत येऊन बसला, तेव्हां चंद्राकडे पाहून आपल्या स्त्रीचें स्मरण झाल्याबरोबर त्याला काम-विकार पहिल्यापेक्षां जास्त होऊन आंगाचा संताप अधि-क होऊं लागला, तेव्हां तो चंद्राकडे पाहून म्हणतो, हा चंद्र संताप—उष्णता देतो ह्म० चांदण्यांत बसून

थंडपणा यावा तो न येतां उलटी गर्मी होते, ह्या· स्तव हा चंद्र नव्हे तर सूर्य आहे. रवी ह्मणावा तरि रात्र आहे. परंतु हा रवी—सूर्य ह्मणावा, तर आतां रात्र आहे. रात्रीं सूर्य कोठचा. हा सागरांतून नि· घोंन गेला. समुद्रांत वडवाग्नि असतो, तो वडवाग्नि सागरांतून—समुद्रांतून निघून गेला. आकाशमार्गीं वड· वाग्नि ठेला. आणि तो आकाशांत जाऊन ठेला ह्म० राहिला. तो हा वडवाग्निच आकाशांत दिसतो आहे हा चंद्र नव्हे.

बहुत समय जातां चंद्र आला घराला
निरखुनि बहु हर्षे दिग्वधू त्या वराला ॥
भरुनि गगनताटीं शुद्ध नक्षत्ररत्नें.
स्वपतिवरुनि ओंवाळूनि टाकी प्रयत्नें ॥ ५ ॥

**टीका** ॥ नुकताच चंद्रोदय होऊन आकाशांत नक्षत्रें च· मकत होतीं त्यावेळीं कवि कल्पना करतो. दीर्घ प्रवा· स करून फार दिवसांनीं नवरा घरीं आला ह्मणजे जि· ची आपल्या पतीवर खरी प्रीति असते ती बायको जशी आनंदित होते, आणि आपल्या नवऱ्यावरून लिंबलोण उतरते, तशी या श्लोकांत कवीनें कल्पना केली आहे. बहुत समय जातां चंद्र आला घराला. बहुतवेळ गे· ल्यानंतर चंद्र घरीं आला ह्म० पूर्व दिशेकडे त्याचा उ· दय झाला. तेव्हां. निरखुनि बहु हर्षे दिग्वधू त्या वराला. तो वर ह्म० तो नवरा जो चंद्र त्यास निरखुनि—पाहून दिग्वधू. दिक्—दिशा ह्म० पूर्वदिशा हीच वधू ह्म०

त्या चंद्राची स्त्री ही बहु–फार हर्षे–आनंदित झाली भरुनि गगनताटीं शुद्ध नक्षत्ररत्नें. आणि त्या स्त्रीनें गगनताटीं. गगन–आकाश हेंच ताट त्या ताटांत शुद्ध–स्वच्छ जीं नक्षत्रें हींच रत्नें हीं भरून. स्वपतिवरुनि ओंवाळूनि टाकी प्रयत्नें. ती स्त्री स्वपतिवरुनि ह्म० आपला नवरा जो चंद्र त्यावरून तीं रत्नें मोठ्या प्रयत्नानें ओंवाळूनच टाकते आहे कीं काय ?

हा चंद्रमा उगवला गगनप्रदीप
आहेत शुक्र गुरु मंगळ ज्यासमीप ॥
त्याचा प्रकाश भरला गगनोदरांत
तों अंधकार लपला गिरिगव्हरांत ॥ ६ ॥

टीका ॥ हा चंद्रमा उगवला गगनप्रदीप. उगवलेला चंद्रमा–चंद्र हा गगनप्रदीप. गगन ह्म० आकाश ह्यांतला प्रदीप ह्म० मोटा दिवाच आहे. आहेत शुक्र गुरु मंगळ ज्यासमीप. ज्या चंद्राजवळ शुक्र, गुरु, मंगळ हे ग्रह आहेत. त्याचा प्रकाश भरला गगनोदरांत. त्या चंद्राचा प्रकाश गगनोदरांत. गगन–आकाश ह्याच्या उदरांत–पोटांत जेव्हां भरला. तों अंधकार लपला गिरिगव्हरांत. तों–तेव्हां गिरिगव्हरांत. गिरि–पर्वत ह्यांचीं गव्हरें ह्म० गुहा ह्यांत ह्म० पर्वतांच्या दऱ्यांत अंधेर लपला. चंद्राचा प्रकाश जेथें पडला, तेथून अंधेर पळाला, आणि भयानें पर्वतांच्या दऱ्यांत जाऊन लपला कीं काय ?

**येतांचि उदया सूर्य श्री देतो कमळां नवी ॥**
**संपत्तीचें हेंचि फळ आप्तपोषण सूचवी ॥ ७ ॥**

**टीका** ॥ सूर्यविकासिनी कमळें सूर्याचा उदय झाला ह्मणजे प्रफुल्लित होत असतात. येतांचि उदया सूर्य श्री देतो कमळां नवी. सूर्य उदयाचलावर येतांच किंवा सूर्याचा उदय होतांक्षणींच तो कमळांस नवी अशी श्री ह्म० शोभा देतो ह्म० कमळें प्रफुल्लित होऊन सुंदर दिसतात. संपत्तीचें हेंचि फळ आप्तपोषण सूचवी संपत्ति मिळविण्याचा हाच उपयोग कीं, आप्त पोषण. आप्त ह्म० आपले संबंधी अथवा इष्टमित्र यांचें आपण पोषण करावें, असें वर सांगितलेलें सूर्याचें उदाहरण सुचवितें.

**धनाहुनी श्रेष्ठ विद्या न नासे न कधीं उणी ॥**
**न देतां न मिळे कोणा देतां हो होतसे दुणी ॥ ८ ॥**

**टीका** ॥ धनाहुनी श्रेष्ठ विद्या. धन ह्म० द्रव्य ह्याहून विद्या श्रेष्ठ—मोठी आहे. कारण कीं, न नासे न कधीं उणी. ही कधीं नासत नाहीं व कधीं उणी होत नाहीं. न देतां न मिळे कोणा. ही न देतां ह्म० दिल्यावांचून कोणास मिळत नाहीं. द्रव्यापेक्षां विद्येंत आणखी हा एक विलक्षण गुण आहे कीं, देतां ही होतसे दुणी. ही दुसऱ्यास दिली असतां आपली दुप्पट होते ह्म० आपली विद्या वाढते.

आर्या.

**अनुकूळ दैव असतां,**
**न समर्थ करावयास हानि यम ॥**

**होतां तें प्रतिकूळ,**
**प्रबळहि दुर्बळचि होय हा नियम ॥ ९ ॥**

**टीका ॥** अनुकूळ दैव असतां. दैव ह्म० प्रारब्ध अनुकूळ—सहाय असतां. न समर्थ करावयास हानि यम यम हानि करावयास समर्थ न, असा ह्या शब्दांचा अन्वय. साक्षात् यम देखील हानि ह्म० नाश करण्या समर्थ होत नाहीं. होतां तें प्रतिकूळ. आणि तें ह्म० दै प्रतिकूळ—विपरीत झालें असतां. प्रबळहि दुर्बळचि हो हा नियम. प्रबळ ह्म० मोठा बळवान असला तरी तं निर्बळच होतो. असा नियम आहे.

---

## दारिद्र्याविषयीं.

### श्लोक.

**निर्द्रव्या पुरुषा न बंधु भजती त्या मान कोठें नसे**
**जातां तो धनिच्या गृहा कुशलही त्याला न कोणी पुसे।**
**थोरांपासुनि दूर दूर फिरतो लाजोनि वस्त्राविणें**
**वाटे निर्धनता महा नरक हा हा धिक् तयाचें जिणें॥ १०॥**

**टीका ॥** निर्द्रव्या पुरुषा न बंधु भजती. निर्द्रव्य ह्म० ज्याजवळ द्रव्य नाहीं ह्म० दरिद्री अशा पुरुषास त्याचे बंधु न भजती ह्म० सेवा करित नाहींत ह्म० त्याचा सन्मान वगैरे ठेवित नाहींत. त्या मान कोठें नसे. त्या ह्म० दरिद्री मनुष्यास मान ह्म० प्रतिष्ठा कोठेंच असत नाहीं. जातां तो धनिच्या गृहा कुशलही त्याला न कोणी

पुसे. तो धनिह्या ह्म० श्रीमंताच्या गृहा—घरीं गेला असतां त्याला कुशल—स्वस्तिक्षेम वगैरे कोणी पुसत नाहीं. थोरांपासुनि दूर दूर फिरतो लाजोनि वस्त्राविणें. वस्त्राविणें ह्म० आपणास वस्त्र नाहीं ह्मणून लाजून तो थोर मनुष्यांपासून ह्म० श्रीमंतांपासून दूर दूर फिरतो ह्म० तो त्यांच्या जवळ येत नाहीं. वाटे निर्धनता महा नरक हा हा धिक् तयाचें जिणें. निर्धनता ह्म० दरिद्रीपणा हा महा नरक—मोठा नरक आहे, असें कवि ह्मणतो मला वाटतें, ह्मणून हा—हरहर तयाचें ह्म० अशा नरकांत राहणारा जो त्याचें जिणें ह्म० वांचणें ह्याला धिक्कार असो.

दारिद्र्यमित्रा वससी शरीरीं
माझ्याच तूं मानुनि सौख्य भारी ॥
परंतु वाटे मज दुःख मोठें
मेल्यास मी जाशिल सांग कोठें ॥ ११ ॥

टीका ॥ दारिद्र्यमित्रा वससी शरीरीं माझ्याच तूं मानुनि सौख्य भारी. कोणी एक मनुष्य दारिद्रीपणास ह्मणतो, अरे मित्रा दारिद्र्या, माझ्याच शरीरांत तूं फार सुख मानून राहतेस खरें, परंतु वाटे मज दुःख मोठें., पण मला फार दुःख वाटतें कीं, मेल्यास मी जाशिल सांग कोठें. मी मेलों तर तूं कोठें जाशील हें मला सांग. कारण तूं माझ्याशीं इतक्या मित्रपणानें वागतेस त्या अर्थी तुझीही काळजी मला करणें अवश्य आहे. हें उपरोधिक बोलणें होय.

## सीतेचा बाप जनकराजा हा सीतेच्या बाळपणींचें सुख आठवितो.

### दिंडया.

बाइ माझे लाडके सिता बाई ॥
बाळपणींचें कौतूक वदूं काई ॥ १ ॥

**टीका** ॥ अगे माझे अवडते सिताबाई, तुझ्या बाळपणींचें कौतुक ह्म० मौज जी मला वाटे ती काय वदूं ह्म० काय सांगूं ?

तुझें पाहतसें बाळपणीं मूख ॥
होय मजला तें काय वदूं सूख ॥ २ ॥

**टीका** ॥ बाळपणीं तुझें तोंड मी पाहीं, आणि मला जें सुख—आनंद होई तो काय वर्णूं ह्म० तो इतका आनंद होई कीं, तो सांगतां देखील येत नाहीं.

विनाकारण रोदन हास्य यावें ॥
तिहीं वदनातें फार शोभवावें ॥ ३ ॥

**टीका** ॥ विनाकारण—कारणावांचून ह्म० उगीच तुला रोदन ह्म० रडें आणि हसें हीं यावीं. आणि तिहीं ह्म० त्या रडण्याहंसण्यांनीं तुझ्या वदनातें—तोंडाला फारच शोभा येत असे.

थोडथोडया कोंवळ्या दंतपंक्ती ॥
जयामाजी उगवल्या शुभ्र कांती ॥ ४ ॥

॥ **टीका** ॥ तुझ्या तोंडांत थोडथोडया कोंवळ्या ह्म०

नुकत्याच आलेल्या दांतांच्या पंक्ति म्ह० रांगा त्या कशी होत्या तर. जयामाजी—ज्या मुखामध्यें शुभ्र कांती उगवल्या. शुभ्र म्ह० स्वच्छ आहे कांति ज्या दंतपंक्तींची असे दांत तुला लहानपणीं आले.

जयापासुन बोबडे बोल गोड ॥
निघुन माझें पुरविलें तिहीं कोड ॥ ५ ॥

टीका ॥ बोबडे म्हणूनच कानाला गोड लागणारे असे तुझ्या मुखांतून जे बोल म्ह० शब्द निघत तिहीं म्ह० त्या बोलांनीं माझें कोड म्ह० मनोरथ पुरविले म्ह० मुलगी लौकर बोलूं लागून तें मीं ऐकावें, अशी माझी फार इच्छा होती ती पूर्ण झाली हा भाव.

आतां कोठें तें वदन तुझें पाहूं ॥
तुझ्या विरहाचें दुःख किती साहूं ॥ ६ ॥

टीका ॥ आतां तें मुख मी कोठें पाहूं, आणि तुझ्या वियोगाचें दुःख किती सोसूं.

---

## सीतेच्या विरहानें दुःखित होऊन रामचंद्र ह्मणतो.

### साक्या.

कैसा दुःखा तें साहूं ॥ कोठें सीतेला पाहूं ॥
पूर्वी दैवें मजला झाला, स्त्रीचा वियोग जेव्हां ॥
होते भेटावया सतीतें, शतशा उपाय तेव्हां ॥ १ ॥

टीका ॥ सीतेच्या विरहाचें दुःख मी कसें सोस सीतेला कोठें पाहूं. पूर्वी दुर्दैवामुळें जेव्हां सीतेच माझा वियोग झाला म्ह० सीता जेव्हां रावणानें नेल होती, तेव्हां सतीतें म्ह० पतिव्रते सीतेला भेटण्याविषय शतशा म्ह० शेंकडो उपाय होते.

पुढच्या आशेवर बहुधा म्यां,
काळक्रमणा केली ॥
आतां तीच्या भेटीचीही
आशा नाहीं उरली. ॥ २ ॥

टीका ॥ सीता मला लौकर भेटेल ह्या पुढच्या अ शेवर मीं काळक्रमणा. काळ म्ह० वेळ ह्याची क्रमणा- घालवणें केलें म्ह० पुढच्या आशेवर मीं दिवस काढले परंतु आतां ह्या वेळेस तर ती भेटेल ही आशाच उरल नाहीं.

मेळविलें म्यां वानरबळ तैं,
सेतु सागरीं रचिला ॥
आतां कोणा सहाय घेऊं,
धीरच माझा खचला ॥ ३ ॥

टीका ॥ सीता भेटावी म्हणून मागें उपाय कोणको णते केले, ते राम सांगतो. मेळविलें म्यां वानरबळ तैं सेतु सागरीं रचिला. तैं—तेव्हां सुग्रीव आदिकरून वानरां चें बळ म्ह० सैन्य मीं मिळविलें आणि लंकेस जाण्याक रितां सागरीं म्ह० समुद्रांत सेतु म्ह० पूल बांधला.

आतां तसें सहाय मी कोणाचें घेऊं ? माझा धीर म्ह० धैर्यच खचून गेलें.

तेव्हां शत्रूशीं म्यां दारुण,
युद्धप्रसंग केला ॥
आतां कोणाशीं मी भांडूं,
न सुचे उपाय मजला ॥ ४ ॥

टीका ॥ तेव्हां म्ह० रावणानें सीता नेली त्या वेळे-स शत्रूबरोबर मीं दारुण म्ह० भयंकर युद्धप्रसंग केला, परंतु सीता मींच घरांतून घालविली, त्या अर्थीं आतां मला कोणाबरोबर भांडावयाचें आहे, कोणाबरोबरही नाहीं. ती भेटण्याचा उपाय म्हणून मला कांहीं सुच-तच नाहीं.

प्राणसखीचा दुर्भाग्यें म्यां, बुद्ध्या केला त्याग ॥
लावूं कोणा दोष आतां मी, हें माझें अत्याग ॥५॥

टीका ॥ दुर्भाग्यें—दुर्दैवानें मीं आपल्या प्राणसखीचा म्ह० सीतेचा बुद्ध्या म्ह० जाणून संवरून त्याग केला म्ह० ती टाकली. आतां दोष मी कोणाकडे लावूं ? हा माझाच अत्याग. अति—मोठा आग म्ह० अपराध हो-य, ह्याचा दोष दुसऱ्याकडे नाहीं.

सीतामुक्तीकारितां रामें, दशवदनाशीं केलें ॥
घोर युद्ध हें सर्व जनांला, गाया कौतुक झालें ॥६॥

टीका ॥ सीतेच्या मुक्तीकारितां म्ह० तिला सोडविण्या-करितां मीं रामानें दशवदनाशीं. दश म्ह० दहा आहे-

व वदनें—तोंड ज्यास असा जो रावण त्याशीं घोर ह्म० भयंकर युद्ध केलें, ही गोष्ट सर्वजनांला ह्म० सर्व लोकांस गाण्याकरितां कौतुक झाली.

**पहिला वियोग रिपुघातावधि, होता उघडच लोकीं**
**आतांचा हा निरवधि आहे, घालिल दुःसह शोकीं॥७**

**टीका** ॥ सीतेचा माझा पहिल्यानें जो वियोग झाला तो रिपुघातावधि. रिपु ह्म० शत्रु रावण त्याच्या घातच्या ह्म० नाशाच्या अवधीपर्यंत होता ह्म० रावण मरे पर्यंतच तिचा माझा वियोग होता, ही गोष्ट लोकांत प्रसिद्धच आहे, परंतु या वेळच्या वियोगाला अवधी-मर्यादाच नाहीं, ह्मणून हा वियोग दुःसह ह्म० मोठ्या सायासानें देखील जो सोसवत नाहीं अशा शोकीं ह्म० दुःखांत मला घालील.

**जरि देहांतुनि निघून जाते, प्राणचि बरवें होतें।**
**वांचुनि नित्य किती सोसावें, दुःसह दुख अहो तें॥८॥**

**टीका** ॥ अशा दुःखांत राहण्यापेक्षां माझ्या देहांतुन प्राण जर निघून जाते, तर बरवं ह्म० चांगलें झालें असतें. असें मी कां म्हणतों तर वांचून म्ह० प्राण धारण करून दुःसह म्ह० सोसवत नाहीं असें जें सीतावियोगाचें दुःख तें मीं नित्य किती सोसावें. तें माझ्यानें सोसवत नाहीं, म्हणून तें दुःख मी कसें सोसं आणि सीतेला कोठें पाहूं.

# रामचद्र सीताविरहानें दुःखित होऊन सीतेला उद्देशून ह्मणतो

## दिंड्या.

प्रिये लंकेमाझारि रावणानें
तुला नेऊन ठेविल्या कारणानें ॥
अह्मीं केले सदुपाय तैं अनेक
अतां त्यांतिल कामास ये न एक ॥ १ ॥

**टीका** ॥ हे प्रिये ह्म० सीते, रावणानें लंकेमाझारी ह्म० लंकेमध्यें तुला नेऊन ठेविलें, या करितां तैं–तेव्हां तुला आणण्याकरितां पुष्कळ सदुपाय ह्म० उत्तम उपाय आह्मीं केले. परंतु त्या उपायांतून आतां एकही उपाय कामास येत नाहीं.

व्यर्थ जेथें सुग्रीवसख्य व्हावें
वानरांचेही वीर्य वृथा जावें ॥
जाबुवंता न स्फुरे बुद्धि कांहीं
मारुतीचीही गती जेथ नाहीं ॥ २ ॥

**टीका** ॥ तुझा शोध करण्याकरितां पूर्वीप्रमाणें आतां सुग्रीवाशीं सख्य–मित्रत्व केलें तर तें जेथें व्यर्थ व्हावें. वानरांचेंही वीर्य–पराक्रम जेथें व्यर्थ जावा. जांबुवानाला जेथें कांहीं बुद्धि सुचूं नये. मारुतीच्यानें देखील जेथें जाववूं नये.

विश्वकर्म्याचा पुत्र नळ त्याची
मार्ग करण्याला शक्ति नसे साची ॥
लक्ष्मणाचे शर जेथ जाति वायां
प्रिये असशी कोणत्या अशा ठायां ॥ ३ ॥

**टीका** ॥ साक्षात् विश्वकर्म्याचा मुलगा जो नळ त्यास देखील जेथें मार्ग—वाट तयार करण्याची शक्ति खरोखरच नसावी. तसेंच जेथें लक्ष्मणाचे शर—बाण वायां—व्यर्थ जावे, अशा कोणत्या ठायां—जागीं, हे प्रिये सीते, तूं आहेस !

---

## सीतेला तिची सखी म्हणते.

### दिंडया.

निराशेनें जाहलें उदासीन
चित्त तुझें विप्रियें फार खिन्न ॥
करुणवचनें याचिया होय दीन
तरी सौजन्यें असे सुप्रसन्न ॥ १ ॥

**टीका** ॥ तुझें चित्त म्ह० अंतःकरण निराशेनें उदास झालें आणि विप्रियें— जें आपणास प्रिय नाहीं म्ह० एखाद्या वाईट गोष्टीनें तुझें अंतःकरण फार खिन्न म्ह० दुःखित झालें. तसेंच करुणवचनें याचिया होय दीन. याचिया म्ह० रामाच्या करुणवचनें म्ह०. दीनवाणीनें तुझें अंतःकरण खिन्न झालें. तरी सौजन्यें म्ह० सुजनपणानें तें सुप्रसन्न म्ह० फार आनंदित असे.

**तुझें आधीं चित्त तें महोदार**
**दीर्घविरहें उत्सूक असे फार ॥**
**तया पाहोनी न करितां उशीर**
**अला प्रेमाचा पूर त्या गभीर ॥ २ ॥**

**टीका** ॥ तुझें आधीं चित्त तें महोदार. तुझें अंतःकरण अगोदरच महोदार म्ह० मोठें उदार. आणि तशांत दीर्घविरहें उत्सूक असे फार. दीर्घविरहें. दीर्घ—फार दिवसांचा जो रामाचा विरह— वियोग त्यामुळें तो ( राम ) पाहण्याविषयीं तें फार उत्सुक म्ह० उत्कंठित असे. तया पाहोनी न करितां उशीर. तया म्ह० त्या रामाला पाहून उशीर न करितां म्ह० लौकरच. अला प्रेमाचा पूर त्या गभीर. त्या तुझ्या अंतःकरणाला प्रेमाचा गभीर म्ह० मोठा पूर आला म्ह० रामचंद्रास पाहून अति प्रेमानें तुझें अंतःकरण अगदीं सद्गदित झालें.

**चित्त तुझें वाटतें चंद्रकांत**
**पुढें येतां प्रिय पूर्णचंद्र कांत ॥**
**प्रेमपाझर सूटला तया भारी**
**घडे स्वाभाविक कोण तया वारी ॥ ३ ॥**

**टीका** ॥ चंद्राचा उदय झाल्यानंतर चंद्रकांतमणि पाझरत असतो. सीतेची सखी सीतेला म्हणते, सीते, तुझें चित्त म्ह० अंतःकरण हें चंद्रकांतमणिच आहे असें मला वाटतें. कशावरून तर. पुढें येतां प्रिय पूर्ण चंद्रकांत. तझा प्रिय म्ह० प्राणप्रिय आणि पूर्णचंद्राप्रमाणें आनंद

देणारा जो कांत म्ह० पति रामचंद्र तो तुझ्या पुढें तांच. प्रेमपाझर सूटला तया भारी. तया ह्म० तुझ्या अंतःकरणाला प्रेमाचा फार पाझर सुटला. स्वाभाविक कोण तया वारी. जी गोष्ट स्वाभाविक मुळच्या स्वभावानेंच घडणारी तिचें निवारण कोण णार आहे. ? कोणी नाही. तसें रामाला पाहून तु अंतःकरणाला जो स्वाभाविकच प्रेमाचा पाझर सु त्याचेंही कोणाच्यानें निवारण होणार नाहीं हा भाव.

---

## स्फुट कविता.

### श्लोक.

शास्त्रें फार अपार जीवित तुझें अत्यल्प कीं मान<br>
तेंही विघ्नशताभिभूतचि असे नाहींच रे वानवा ॥<br>
घेईं वास्तव सारभूतचि असे जो अंश त्यातें बुध<br>
घेतो हंस जसा पयोऽन्वितजलापासून एक्या दुधा ॥

टीका ॥ शास्त्रें फार अपार जीवित तुझें अत्यल्प मानवा. हे मानवा ह्म० मनुष्या शास्त्रें अतिशय अ ह्म० त्यांचा अंत लागत नाहीं अशीं कठिण आहेत, तूं ह्मणशील कीं मी जन्मपर्यंत शास्त्राभ्यास करीन जीवित तुझें अत्यल्पकीं. तुझें जीवित–आयुष्य वांचणें अत्यल्प ह्म० फार थोडें आहे. तेंही विघ्न भिभूतचि असे नाहींच रे वानवा. तें वांचणेंही विघ्न भिभूत. विघ्नशत ह्म० शेंकडों विघ्नें त्यांनीं अभिभू व्याप्त असें आहे ह्म० तुझ्या वांचण्यास हजारों

आहेत. रे ह्म० अरे मानवा ह्याविषयीं वानवा ह्म० संशय नाहीं, हें खरेंच आहे. घेईं यास्तव सारभूतचि असे जो अंश त्यातें बुधा. हे बुधा ह्म० शहाण्या, याकरितां शास्त्रांत जो सारभूत अर्थ ह्म० घेण्यासारखा तात्पर्यार्थ जितका असेल तितकाच तूं घे. यास दृष्टांत: घेतो हंस जसा पयोन्वितजलापासून एकया दुधा. पयोन्वित. पय—दूध ह्यानें अन्वित—युक्त ह्मणजे ज्यांत दूध मिसळलें आहे अशा जलापासून ह्म० पाण्यांतून एकया दुधा ह्म० केवळ दुधच जसा हंसपक्षी घेतो, आणि पाणी टाकतो, तसा तूं, हे मानवा, शास्त्रांतील ग्राह्य अंश काढून घे.

**भल्याच्या संगानें अवगुण असे तो गुण दिसे**
**खळाच्या संगानें सुगुण तरि तो लोपत असे ॥**
**जसें खारें पाणी पिउनि घन तें गोड करिती**
**फणी दुग्धातेंही पिउनि गरळातेंचि वमती ॥ २ ॥**

टीका ॥ भल्याच्या संगानें अवगुण असे तो गुण दिसे. भल्याच्या ह्म० सज्जनाच्या संगतीनें अवगुण ह्म० दुर्गुण असला तरी तो गुण ह्म० सद्गुणच दिसतो. खळाच्या संगानें सुगुण तरि तो लोपत असे. खळाच्या—दुष्टाच्या संगतीनें सुगुण ह्म०चांगलाही गुण असला तरी तो लोपत असे—दिसेनासा होतो. यास दृष्टांत. जसें खारें पाणी पिउनि घन तें गोड करिती. समुद्राचें वगैरे खारें पाणी पिऊन घन ह्म० मेघ जसें त्याचें गोडें पाणी करतात. ह्म० सूर्याच्या तापानें समुद्राच्या पाण्याची वाफ होऊन ती हवेपेक्षां हलकी असते ह्मणून वर जाते, आणि थंड

हवेच्या योगानें वाफेचें गोडपाणी होऊन तें मेघरू
खालीं येतें, या रीतीनें मुळचें खारें पाणी असून त
गोडें पाणी होतें. फणी दुग्धातेंही पिउनि गरळा
वमती. आणि फणी ह्म० साप दूधही पिऊन त्या दु
गरळ ह्म० विषच वमती—ओकतात ह्म० सापाच्या मु
व दुधासारख्याही मधुर पदार्थाचें विषच होतें. त
सज्जनदुर्जनांच्या संगतीप्रमाणें गुण किंवा अवगुण हो

आर्या.

**गुणवत्संबंधानें नीचहि पावे सदा महत्वास ॥**
**पुष्पांच्या संबंधें सूत्रालाही घडे शिरीं वास ॥**

**॥ टीका ॥** गुणवत्संबंधानें नीचहि पावे सदा महत्व
गुणवत् ह्म० सद्गुणी मनुष्याच्या संबंधानें ह्म० सहवास
नीचहि ह्म०हलकाही मनुष्य महत्वास—मोठेपणास प
तो. यास दृष्टांत माळेचा. पुष्पांच्या संबंधें सूत्रालाही
शिरीं वास. माळेंत फुलांच्या संगतीनें सूत्रालाही ह्म०
तालादेखील शिरीं ह्म० डोक्यावर वास म्ह० राहणें
डतें म्ह० फुलांच्या सहवासामुळें सुतालाही मस्तकासा
उत्तम स्थान बसायास मिळतें.

दिंड्या.

**खळा येतें साधुत्व साधुसंगें**
**दुष्टसंगें साधुत्व तें न भंगे ॥**
**पुष्पसंगें मातीस वास लागे**
**मृत्तिकेचा पुष्पांत गुण न वागे ॥ ४ ॥**

**टीका** ॥ खळा येतें साधुत्व साधुसंगें. सज्जनाच

संगतीनें खळा ह्म० दुष्टाला साधुत्व ह्म० भलेपण येतें ह्म० त्याला सज्जनाचे गुण लागतात. दुष्टसंगें साधुत्व तें न भंगे. परंतु दुष्टाच्या सहवासानें सज्जनाचें साधुत्व. ह्म० भलेपण न भंगे ह्म० त्याचा नाश होत नाहीं. यास दृष्टांत. पुष्पसंगें मातीस वास लागे. जमिनीवर फूल पडल्यानें त्या मातीला फुलाचा सुवास लागतो. मृत्तिकेचा पुष्पांत गुण न वागे. पण मृत्तिकेचा ह्म० मातीचा गुण फुलांत येत नाहीं ह्म० फुलाला मातेरा वास येत नाहीं.

श्लोक.

प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे
तृषार्तांची तृष्णा मृगजळ पिऊनीहि वितळे ॥
सशाचेंही लाधे विपिन फिरतां शृंगहि जरी
परंतू मुर्खाचें हृदय धरवेना क्षणभरी ॥ ५ ॥

टीका ॥ प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे. वाळूचे कण जर प्रयत्नें ह्म० जोरानें रगडले, तर त्यांपासून तेलही निघेल. तृषार्तांची तृष्णा मृगजळ पिऊनीहि वितळे. मृगजळ ह्म० उन्हाळ्यांत दोनप्रहरच्या वेळेस सूर्याच्या उष्णतेमुळें मैदान जमिनींतून वाफा निघून त्या दूर अंतरावरून जलप्रवाहासारख्या दिसतात; परंतु तेथें वास्तविक पाणी नसतें तें होय. तें मृगजळ पिऊनीही तृषार्तांची—ताहानलेल्याची तृषा—ताहान वितळे—भागेल. सशाचेंही लाधे विपिन फिरतां शृंगहि जरी. सशाला शिंगें नसतात, पण विपिन ह्म० अरण्य त्यांत

फिरलें असतां सशाचेंही शिंग लाधे–मिळेल. इतक्या असंभवी गोष्टी कदाचित् होऊं शकतील; परंतु मूर्खा हृदय धरवेना क्षणभरी. पण मूर्खमनुष्याचें हृदय ह्म अंतःकरण धरूं ह्मटलें असतां एक क्षणभर देखील ध बणार नाहीं ह्म० त्याचें मन एक क्षणभर देखील व विता येणार नाहीं.

---

## अन्योक्ति.

### श्लोक.

कर्णाला कटु शब्द सोडुनि
उगा बा बैससी तूं जरी
काका आम्रतरूवरी मग तुला
कोकीळ मानूं तरी ॥
कीं वस्तु स्थलवैभवें करुनियां
मोठेपणा पावती
नेपाळेश्वर भाळलग्नचिखला
कस्तूरिका मानिती ॥ ६ ॥

टीका ॥ अन्योक्ति म्ह० चाललेल्या गोष्टीचें वर्ण सोडून बाहेरील एखाद्या गोष्टीचें जेथें वर्णन केलें असं व त्या वर्णनावरून त्या चाललेल्या गोष्टीचा सहज बो होतो, त्यास अन्योक्तिनामक अलंकार ह्मणतात. को एक मनुष्य हलकट, बिभित्स भाषण बोलणारा असे, प्यार प्रतिष्ठित लोकांत आपला शिष्टपणाचा डौल मि

वी, त्यास उद्देशून कोणी एक ब्राह्मण मनुष्य उपदेश करतो. कर्णाला कटु शब्द सोडुनि उगाचा बैससी तूं जरी काका आम्रतरूवरी. बा काका— अरे कावळ्या, कर्णाला— कानाला कटु—कडू लागणारा असा शब्द सोडून तूं जर आम्रतरूवरी म्ह० आंब्याच्या झाडावर उगाच बसलास. मग तुला कोकीळ मानूं तरी. तर मग आंब्याच्या झाडावर तूं कावळा नव्हस, कोकीळच बसला आहेस असें आह्मी समजूं. तूं म्हणशील कीं, मी कावळा असून कोकिळा-च्या मोठेपणा तुह्मी मला कसा द्याल, तर रंगानें तुझा व कोकिळाचा सारखेपणा असून तूं आंब्यासारख्या उत्त-म वृक्षावर बसला आहेस, म्हणून तुला कोकिळच मानूं. कारण. कीं वस्तु स्थलवैभवें करुनियां मोठेपणा पावती. कीं— कारण, स्थलवैभवें करुनियां म्ह० जागयाच्या मा-हात्म्यामुळें वस्तु—पदार्थ मोटेपणास चढत असतात. यास दृष्टांत. नेपाळेश्वरभाळलग्नचिखला कस्तूरिका मानिती. नेपाळेश्वर—नेपाळदेशाचा ईश्वर म्ह० राजा याच्या भाळलग्न—कपाळास लागलेला चिखल जरी असला, तरी त्याला कस्तूरी आहे असें लोक मानतात. कारण, मोठ्याच्या कपाळावरचा तो चिखल म्हणूनच त्याला मो-ठेपणा देतात तसें हे कावळ्या, तूं रंगानें कोकिळपक्ष्या-सारखा असून आंब्याच्या उत्तम झाडावर बसला आहेस म्हणून तुला आम्ही कोकिळच मानूं, शब्द मात्र करूं नको.

**येथें समस्त बहिरे बसतात लोक**
**कां भाषणें मधुर तूं करिसी अनेक ॥**

**हे मूर्ख ज्यांस किमपीहि नसे विवेक**
**रंगावरूनि तुजला गणितील काक ॥ ७ ॥**

**टीका** ॥ कोणी मनुष्य मूर्ख लोकांपुढें पांडित्य करि होता, हें पाहून कोणी चतुर पुरुष त्यास अन्योक्तीं म्हणतो कीं :—.

कोणी कोकिळ झाडावर मंजूळ शब्द करित बसल होता, त्यास कोणी पुरुष म्हणाला. येथें समस्त बहिरे बसतात लोक. या ठिकाणीं समस्त— सर्व बहिरे लोक बसतात. कां भाषणें मधुर तूं करिसी अनेक. म्हणून मधुर—गोड अशीं अनेक भाषणें म्ह० शब्द तूं उगीच कां करतोस म्ह० तुझ्या मधुर ध्वनीचा येथें उपयोग नाहीं कारण कीं, हे मूर्ख ज्यांस किमपीहि नसे विवेक. ज्य लोकांस किमपी म्ह० थोडाही विवेक म्ह० विचार नाहीं असे हे मूर्ख लोक आहेत. रंगावरूनि तुजला गणितील काक. हे कोकिळा, तुझा आणि कावळ्याचा रंग काळाच आहे, म्हणून रंगावरून तुला कावळाच हे समजतील. ह्याकरितां तुझ्या मंजुळ शब्दांची प्रशंसा या मूर्ख लोकांपुढें काय होणार आहे. ? हा भाव.

**बैसोनी सखया पिका उगिच तूं मार्गप्रतीक्षा करीं**
**जों आंबे फुलती सुगंध सुटतो येई मधू तोंवरी ॥**
**तेव्हां सार्थकतेस पावतिल बा हीं गोड वाक्यें तुझीं**
**सध्या ग्रीष्म असे धुळी उडतसे दे दुःख नेत्रांस जी ॥ ८ ॥**

**टीका** ॥ पूर्वश्लोकाप्रमाणें येथेंही कोणी पुरुष दुसऱ्यास अन्योक्तीनें सुचवितो. उन्हाळ्यांत कोणी एक कोकिळ मंजुळ

शब्द करित एका झाडावर बसला होता, त्यास उद्देशून कोणी एक मनुष्य म्हणाला. बैसोनी सखया पिका उगिच तूं मार्गप्रतीक्षा करीं. सखया ह्म० मित्रा पिका—कोकिळा, तूं उगीच बसून ह्म० कांहीं शब्द न करितां मार्गप्रतीक्षा करीं. उत्तम वेळ येण्याची वाट पाहात बैस. कोठ-पर्यंत वाट पाहूं असें तूं ह्मणशील तर. जों आंबे फुलती सुगंध सुटती येई मधू तांवरी. आंब्याच्या झाडांस मोहोर ज्या ऋतूंत येत असतो आणि सुगंध जिकडे तिकडे सुटत असतात. असा मधु ह्म० वसंत ऋतु येई तों-पर्यंत. तेव्हां सार्थकतेस पावतिल बा हीं गोड वाक्यें तुझीं. तुझीं गोड—मधुर जीं वाक्यं ह्म० तुझे शब्द ह्यांचें सार्थक्य तेव्हां ह्म० त्या ऋतूंत होईल. सध्या ग्रीष्म असे धुळी उडतसे दे दुःख नेत्रांस जी. हल्लीं ग्रीष्म ह्म० उन्हाळा आहे, नेत्रांस—डोळ्यांस जी दुःख दे म्ह० देते अशी धूळ उडत आहे, तर अशा वेळेस तुझ्या मधुर वाणीचें सार्थक्य व्हावयाचें नाहीं, म्हणून वसंतऋतूची तूं वाट पाहा.

---

## सीतास्वयंवरप्रकरणीं.

### ( वामनी श्लोक. )

त्रिशत गण शिवाचे सत्वरें त्या धनुष्या
उचलिति न ढळे जें अन्यदेवां मनुष्यां ॥
परि बहुबहुकष्टीं आणिलें चाप रंगीं
दचकति नृप सारे देखतां अंतरंगीं ॥ १ ॥

टीका ॥ सीतास्वयंवर होण्याच्या प्रसंगीं जनकराजाच्या

सभामंडपीं देशोदेशींचे राजे येऊन बसले होते, त्यात रावणही आला होता. आणि जनकराजाच्या घरीं शिवाचें धनुष्य फार दिवसांपासून होतें, त्याचा जो भंग करील त्यास सीतेनें माळ घाळावी असा जनकराजानें पण केला होता, त्या प्रसंगाचें कवि वर्णन करितो. तें धनुष्यै इतकें मोठें होतें कीं. त्रिशत गण शिवाचे सत्वरें त्या धनुष्या उचलिति. शिवाचे त्रिशत म्ह० तीनशें गण–दूत जेव्हां लागत तेव्हां तें धनुष्य लौकर उचलीत. न ढळे जें अन्यदेवां मनुष्यां. इतर देव आणि मनुष्य ह्यांस जें धनुष्य जाग्यावरून न ढळे ह्म० हालत नसे. परि बहुबहुकष्टीं आणिलें चाप रंगीं. परंतु फारफार कष्टीं–श्रमानें तें चाप–धनुष्य रंगीं म्ह० सभेच्या जागीं जनकाच्या दूतांनीं आणिलें. दचकाति नृप सारे देखतां अंतरंगीं. तें अतिशय मोठें धनुष्य पाहून नृप म्ह० राजे अंतरंगीं म्ह० मनांत दचकाति म्ह० भ्याले.

**वाटे तयां परमदुर्लभ ती नवोढा**
**जेव्हां पुरोहित म्हणे धनु कां न वोढा ॥**
**कोणी धरूनि बसले बसल्याचि ठाया**
**उत्साह बुद्धि न मनाप्रति दे उठाया ॥ २ ॥**

**टीका** ॥ वाटे तयां परम दुर्लभ ती नवोढा. तयां ह्म० त्या राजांस ती नवोढा–ती नवरी सीता परमदुर्लभ–प्राप्त होण्यास फार कठीण आहे अशी वाटली ह्म० आपणास सीता मिळत नाहीं असें त्यांच्या मनांत आलें. जेव्हां पुरोहित ह्मणे धनु कां न वोढा. तुह्मी धनुष्य कां

ओढित नाहीं, असें जेंव्हां त्या राजांस जनकाचा पुरोहित ह्म० उपाध्याय म्हणाला. कोणी धरूनि बसले बसल्याचि ठायां. तेंव्हां किती एक राजे बसलेल्या जाग्यासच धरून बसले म्ह० आपल्या जाग्यावरून उठले नाहींत. उत्साह-बुद्धि न मनाप्रति दे उठाया बुद्धि मनाप्रति उठाया उत्साह न दे. असा ह्या शब्दांचा येथें अन्वय. ह्या राजांची बुद्धि मनाप्रति—अंतःकरणाला उठण्यास उत्साह—हुरूप किंवा हुशारी देईना. तें धनुष्य हातीं घेण्याकरितां आपण जाग्यावरून उठावें, असें त्यांस वाटेना हा भाव.

तों दशकंठ अकुंठ विसां भुजिं तें
विषकंठधनू उचली
कष्टत कोष्ठवरी द्विज ओष्ठहि
चावुनि ज्या जरि ने खचली ॥
त्याउपरी दडपे झडपे मग
आननपंक्ति धरे रचली
वासुनि दांत मुखांत दहांत
पडे मति गाढतमीं पचली ॥ ३ ॥

**टीका** ॥ तों दशकंठ अकुंठ विसां भुजिं तें विषकंठधनू उचली. तों— तेंव्हां दशकंठ. दश—दाहा आहेत कंठ— शिरें ज्यास असा रावण हा अकुंठ म्ह० दृढ असा विसां भुजिं म्ह० विसां हातांनीं तें विषकंठधनू. विष आहे ज्याच्या कंठांत असा जो सांब त्याचें तें धनू म्ह० धनुष्य उचलूं लागला. म्ह० रावण तें धनुष्य आपल्या विसां हातांनीं उचलूं लागला असा भाव.

कष्टत कोष्ठवरी द्विज ओष्ठाहि चावुनि ज्या जरि ने खचं-
ली. आणि द्विज म्ह० दांत आणि ओष्ठ म्ह० ओंठ हे
चावून कष्टत म्ह० मोठे श्रम करीत कोष्ठवरी म्ह०
पोटापर्यंत जरी रावणानें धनुष्याची ज्या म्ह० दोरी ने-
नेली. तरी ती दोरी खचली म्ह० हातांतून निसटली,
तेव्हां रावण खालीं पडला. आणि धनुष्यही पडलें. त्या-
उपरी दडपे झडपे मग आननपंक्ति धरे रचली.
त्याउपरी म्ह० त्यानंतर रावणाला त्या धनुष्याचा
आघात बसून त्याखालीं तो दडपून गेला. आणि
त्याची आननपंक्ति. आनन म्ह० मुखें ह्यांची पंक्ति
म्ह० ओळ धरे—पृथ्वीवर रचली म्ह० पसरली. वासु-
नि दांत मुखांत दहांत पडे मति गाढतमीं पचली.
मुखांत म्ह० तोंडांत दांत वासून रावण दहांत म्ह०
बहुत जमलेले जे राजे त्या सभेंत होते त्यांत पडला. तेव्हां
रावणाची मति—बुद्धि गाढतमीं म्ह० मोठ्या दुःखांत
पचली—बुडाली. म्ह० रावणाला फारच दुःख झालें
असा भाव.

**ह्मणे विश्वामित्र स्वमनिं सकळांचे भरंवसे**
**कळों आले आतां मज जवळि विश्वंभर वसे ॥**
**तया या श्रीरामाविण जनकजा अन्य न वरी**
**ह्मणोनी बोले कीं उठिं रघुपती साधिं नवरी ॥ ४ ॥**

**टीका** ॥ ह्मणे विश्वामित्र स्वमनिं सकळांचे. भरंवसे कळों
आले आतां. विश्वामित्र ऋषि रामलक्ष्मणांस घेऊन त्या
स्वयंवराच्या समारंभास आला होता. तेव्हां रावणाची

ती दशा पाहून व इतर राजेही कोणी उठत नाहींत, हें पाहून विश्वामित्र आपल्या मनांत ह्मणाला कीं, सक. ळांचे ह्म० सर्व राजांचे भरंवसे आतां कळून आले. ह्म० कोणाच्यानेंही हें धनुष्य मोडवत नाहीं. मज जवळि विश्वंभर वसे. माझ्या जवळ विश्वंभर ह्म० वि. श्वाचें पोषण करणारा जो प्रभु राम तो बसला आहे. तया या श्रीरामाविण जनकजा अन्य न वरी. तया ह्म० त्या ह्या श्रीरामावाचून जनकजा ह्म० जनकापासून जा ह्म० झालेली सीता ती अन्य— दुसरा वरित नाहीं. रामचं. द्रालाच वरील. ह्मणोनी बोले कीं. ह्मणून विश्वामित्र बोलला कीं. उठिं रघुपती साधिं नवरी. रघुपति ह्म० हे रामचंद्रा, तूं ऊठ आणि ही नवरी साधिं ह्म० मिळीव.

श्रीराम तेव्हां मुनिपादपद्मा
वंदी जयाचे स्वपदींच पद्मा ॥
आज्ञा गुरूची ह्मणऊनि साची
करीन बोलोनि उठे तसाची ॥ ५ ॥

टीका ॥ श्रीराम तेव्हां मुनिपादपद्मा वंदी. तेव्हां विश्वा- मित्राचें असें भाषण ऐकून श्रीराम मुनिपादपद्मा वंदी. मुनि—विश्वामित्र त्याचे पाद—चरण हेंच पद्म—कमळ ह्म० विश्वामित्राच्या चरणकमळास रामचंद्रानें नमस्कार के- ला. जयाचे स्वपदींच पद्मा. पद्मा ह्म० लक्ष्मी ही ज्या रामाच्या स्वपदीं—साक्षात् त्याच्या चरणींच आहे त्या रामानें विश्वामित्राच्या चरणीं वंदन केलें. आज्ञा गुरूची ह्मणऊनि साची करीन. गुरूची ह्म० विश्वामि-

त्राची आज्ञा ह्मणून मी ती आज्ञा त्याची—खरी क
बोलोनि उठे तसाची. असें बोलून रामचंद्र लाग
च उठला.

शृंगारवीरकरुणादि नवां रसांची
लीला जगद्गुरुचिया पदसारसांची ॥
स्वप्रेम तो दशम त्यासह त्या नवांतें
दावी सभेसि उठतां सुरमानवांतें ॥ ६ ॥

**टीका** ॥ शृंगारवीरकरुणादि नवांरसांची लीला जगद्गुरुचिया पदसारसांची. जगाचा गुरु ह्म० नियं जो रामचंद्र त्याच्या पदसारसांची. पद—चरण हीं सारसें—कमळें ह्म० कमळा सारखे शोभणारे जे रामचंद्राचे चरण त्यांची जी लीला—क्रीडा ही कोणकोणत्या रसांची होती तर. शृंगारवीरकरुणादिनवांरसांची शृंगाररस, वीररस, करुणारस अद्भुतरस, हास्यरस, भयानकरस बीभत्सरस, रौद्ररस, आणि शांतरस ह्या नवांरसांची होती ह्म० रामचंद्र उठून चालूं लागला, तेव्हां हे नऊ रस त्या सभेंत उत्पन्न झाले. स्वप्रेम तो दशम त्यासह त्या नवांतें. आणि तो स्वप्रेम. आपले ठायीं सर्वांचा तो प्रेमरस—भक्तिरस हा दाहावा ह्यासहवर्तमान त्या नऊ रसांतें. दावी सभेसि उठतां सुरमानवांतें. रामचंद्र उठला, तेव्हां सभेला आणि सुर—देव आणि मानव—मनुष्य ह्यांस दावा ह्म० दाखवी. रामचंद्र तें धनुष्य सज्य करण्याकरितां जेव्हां उठला, तेव्हां त्या सभेंत वर सांगितलेले, दाहा रस उत्पन्न झाले, असा भाव.

लज्जावती फार तथापि त्याची
शंका न सीता धरि हो पित्याची ॥
म्हणे अहा तात अशा पणातें
केलें तुवां संकट आपणातें ॥ ७ ॥

**टीका** ॥ लज्जावती फार तथापि त्याची. त्याची ह्म० जनकराजाची लज्जावती-मर्यादा राखणारी अशी जरी सीता होती, तथापि ह्म० तरी. शंका न सीता धरि हो पित्याची. हो-अहो पित्याची-आपल्या बापाची सीतेनें शंका-भय धरिलें नाहीं आणि ती ह्मणाली अहो तात ह्म० बापा, असापण ह्म० हें शिवाचे धनुष्य जो मोडील त्याच्या गळ्यांत मीं माळ घालावी, अशा प्रकारचा पण-प्रतिज्ञा जी तूं केली आहे, हें तूं आपणांस संकटच आणलें आहे.

बहु कठोर म्हणे धनु जानकी
निपट कांसवपृष्ठसमान कीं ॥
रघुपती तरि हा लघु आपण
अहह दारुण तात तुझा पण ॥ ८ ॥

**टीका** ॥ तें संकट कोणतें तें सीता सांगते. बहु कठोर ह्मणे धनु जानकी. जानकी म्हणाली कीं हें धनु ह्म० धनुष्य फार कठोर म्ह० कठीण आहे. तें किती कठीण तर इतकें कीं. निपट कांसवपृष्ठसमान कीं. निपट म्ह० केवळ कांसवपृष्ठसमान. कांसवाचा पृष्ट-पाठ त्या समान म्ह० त्या सारखें म्ह० कांसवाची पाठ जशी घट्ट असते, तसें हें धनुष्य फार दृढ आहे. रघुपती तरि

हा लघु आपण. रघुपति म्ह० रामचंद्र हा तर पण—स्वतां लघु—लहान आहे, ह्या करितां हा हें ध: कसें मोडील, याच्यानें मोडवणार नाहीं, म्हणून. अ दारुण तात तुझा पण. हे तात म्ह० बापा जन अहह—हरहर तुझा पण— प्रतिज्ञा दारुण—भयंकर अ रामचंद्राच्या हातून हा पण सिद्धीस जाणें फार कठ आहे असा सीतेच्या बोलण्याचा भाव.

मदनशत्रुशरासन हें महा
मदनमूर्तिच केवळ राम हा ॥
करिल सज्य कसें धनु आपण
अहह दारुण तात तुझा पण ॥ ९ ॥

टीका ॥ मदनशत्रुशरासन हें महा. मदनाचा श जो सांब त्याचें शरासन म्ह० धनुष्य हें महा—मो आहे; मदनमूर्तिच केवळ राम हा. आणि रामचंद्र केवळ मदनमूर्तिच म्ह० मदनासारख आहे मूर्ति ज्याची म्ह० मदनासारखी त्याची आकृ गोजिरवाणी असून कोमळ आहे. करिल सज्य क धनु आपण. असा हा आपण—स्वतां हें धनुष्य सज्य ज्या—दोरी हिशीं स—सहवर्तमान कसें करील म्ह० धनु ष्याला हा दोरी कशी चढवील. अहह दारुण ता तुझा पण. अहह—हरहर हे तात—बापा जनका, तुझ हा पण दारुण म्ह० भयंकर आहे.

छावा उठे दशरथप्रभुदिग्गजाचा
घे चाप इक्षुसम तें पति भर्ग ज्याचा ॥

**शुंडा स्वबाहु उचलोनिच चालिला हो**
**घेती समस्त नयनीं प्रभुचाचि लाहो ॥ १० ॥**

**टीका** ॥ छावा उठे दशरथप्रभुदिग्गजाचा. दशरथ-प्रभु म्ह० दशरथ राजा हाच एक दिग्गज म्ह० फार मोठा हत्ति त्याचा छावा—बालक जो राम तो उठला. घे इक्षुसम तें पति भर्ग ज्याचा. आणि ज्या धनुष्याचा पति म्ह० स्वामी भर्ग म्ह० सांब होय, तें धनुष्य रामानें इक्षुसम. इक्षु—ऊंस त्या सारखें घेतलें. ऊंस हत्ति जसा सहज उचलतो तसें तें धनुष्य रामानें सहज उचलिलें हा भाव. रामचंद्रास हत्तीचा छावा असें वर म्हटलें आहे म्हणून. शुंडा स्वबाहु उचलोनिच चालिला हो. स्वबाहु म्ह० आपला बाहु—हात हीच त्या हत्तीच्या छाव्याची सोंड होय, ती उचलून म्ह० रामचंद्र आपला हात वर करून चालला. घेती समस्त नयनीं प्रभुचाचि लाहो. तेव्हां समस्त म्ह० सर्व लोक ह्यांनीं नयनीं म्ह० डोळ्यांनीं प्रभुचाचि म्ह० रामचंद्राचाच लाहो म्ह० लाभ घेतला. रामाच्या मूर्तीकडेच सर्वांचे डोळे लागले हा भाव.

**घे इक्षु वारण जसा करपुष्करानें**
**श्रीराम चाप उचली कर पुष्करानें ॥**
**मोडी सवेंचि सकळांसहि लाज आणी**
**गेलें नृपाळ मुखिचें उतरोनि पाणी ॥ ११ ॥**

**टीका** ॥ घे इक्षु. वारण जसा करपुष्करानें. वारण म्ह० हत्ती करपुष्करानें. कर म्ह० सोंड हिचें पुष्कर—

अग्र किंवा शेंडा ह्यानें जसा इक्षु–ऊंस घेतो ह्म० उं
जसा तो सहज सोंडेच्या अग्रानें उचलतो. श्रीर
चाप उचली करपुष्करानें. रामचंद्रानें कर म्ह० हा
हेंच पुष्कर–कमळ म्ह० आपल्या हस्तकमळानें त
चाप म्ह० धनुष्य उचलिलें. मोडी सवेंच सकळ
सहि लाज आणी. रामानें सवेंचि म्ह० लागलेंच
मोडलें. तेंव्हां सर्व राजांस त्यानें लाज आणिल
गेलें नृपाळमुखिचें उतरोनि पाणी. नृपाळ–रा
ह्यांचे मुखिचें पाणी म्ह० तोंडावरची टवटवी उतरल
म्ह० सर्वांचीं मुखें निस्तेज दिसूं लागलीं.

गजगती जगतीप्रति दाविते
वसुमती सुमती सुख भाविते ॥
स्वतनुजातनु जाणतसे धरा
नवरि ते वरिते मणिकंधरा ॥ १२ ॥

टीका ॥ गजगती जगतीप्रति दाविते. रामचंद्रानें ध
नुष्य मोडल्यानंतर त्याच्या गळ्यांत माळ घालण्याकरित
सीता निघाली. तेंव्हां सीता आपली गजगती. ग
ज–हस्ति याप्रमाणें जी गती ह्म० गमन हें जगतीप्रति
ह्म० सर्व लोकांस दाखविते, ह्म० सीता माळ घा
लण्याकरितां सर्व लोकांसमक्ष हत्तीप्रमाणें पावलें टाकीत
चालली. हाभाव. वसुमती सुमती सुखभाविते. सुमती–
उत्तमबुद्धीची अशी वसुमती–पृथ्वी ही सुख ह्म०
सीतेच्या चालण्याचें सुख भाविते–अनुभवते. कारण.
स्वतनुजातनु जाणतसे धरा. सीतेची उत्पत्ति पृथ्वीपा-

सून झाली ह्मणून ती सीतेची माता होय. स्वतनुजा-तनु. स्व—आपली जी तनुजा ह्म० कन्या तिची तनु, ह्म० शरीर हें धरा— पृथ्वी जाणे. ह्मणून आपल्या मुलीच्या स्पर्शाचें सुख तिलाच माहीत. नवरि ते वरिते मणिकंधरा. मणिकंधरा मणि— रत्नें अर्थात रत्नांची माळ आहे कंधरा ह्म० गळ्यांत ज्याच्या अशा रामाला ते—ती नवरी—सीता वरिते ह्म० माळ घालते. म्ह० रामाच्या गळ्यांत सीतेनें माळ घातली.

अर्पी गळां हार जया सुकाळीं
सीता सुखाच्या पडली सुकाळीं ॥
विचित्र वाद्यें जन वाजवीती
सीतापतीचें यश गाजवीती ॥ ९३ ॥

**टीका** ॥ अर्पी गळां हार जया सुकाळीं. जया—ज्या सुकाळीं म्ह० सुमुहूर्तीं रामचंद्राच्या गळां म्ह० गळ्यांत हार सीतेनें अर्पी म्ह० घातला. सीता सुखाच्या पडली सुकाळीं. तेव्हां सुखाच्या सुकाळीं म्ह० समृद्धींत—अतिशय सुखांत सीता पडली म्ह० सीतेला पराकाष्ठेचें सुख झालें असा भाव. विचित्र वाद्यें जन वाजवीती. नंतर विचित्र म्ह० नानाप्रकारचीं वाद्यें म्ह० मंगळ-वाद्यें जन—लोक वाजवूं लागले. सीतापतीचें यश गाजवीती. आणि सीतापति. सीतेचा पति—नवरा जो राम ह्याचें यश—कीर्ति ही त्यांनीं गर्जून दिली.

~~~~~~
~~~~~~

## पांडवप्रतापांतील अभिमन्यूच्या युद्धाविषयीं ओंव्यांतील कठिण शब्दांचा अर्थ.

| कठिण शब्द. | अर्थ. |
|---|---|
| युद्ध | लढाई. |
| चक्रव्यूह | चक्रासारखी सेनेची रचना. |
| रचिता झाला | करिता झाला. |
| अद्भुत | चमत्कारिक. |
| सुपर्णव्यूह | गरुडव्यूह. |
| अद्भुतरीती | चमत्कारिक रीतीनें. |
| सबळ | सैन्यांसहवर्तमान. |
| भेदावया | दुभंग करावयास, भेदण्यास. |
| पार्थ | अर्जुन. |
| सुभद्रासुत | सुभद्रेचा मुलगा अभिमन्यु. |
| विनवीतसे | प्रार्थितसे. |
| निर्धारीं | खचीत. |
| अवसरीं | वेळीं. |
| सुकुमार | फार कोमळ. |
| पार्थनंदन | अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु |
| रण | लढाई. |
| धन | द्रव्य. |
| तात | बाप. |
| परमसुंदर | फार देखणा. |

| | |
|---|---|
| सुभद्रासुत | सुभद्रेचा मुलगा. |
| तुळितां | बरोबरी करितां. |
| मन्मथ | मदन. |
| विराटजामाता | विराटाचा जांवई. |
| श्यामवर्ण | काळ्या सांवळ्या रंगाचा. |
| राजीवनयन | कमळासारखे सुंदर आहे त नेत्र ज्याचे असा. |
| आजानुबाहु | गुडघ्यापर्यंत ज्याचे हा लांब आहेत तो. |
| सुहास्यवदन | हांसण्यानें ज्याचें मु शोभतें असा. |
| उत्तरावर | उत्तरेचा पती अभिमन्यू. |
| उदयाद्रीवरी | उदयपर्वतावर. |
| दिनकर | सूर्य. |
| तेजाळ | तेजस्वी. |
| पार्थकुमार | अर्जुनाचा मुलगा. |
| सहस्त्रावधी | हजारो. |
| सौभद्र | सुभद्रेचा मुलगा अभिमन्यु. |
| कुंजर | हत्ती. |
| अयुत | दहा हजार. |
| दळासहीत | सैन्यासहित. |
| राजकुमार | राजांचे मुलगे. |
| शर | बाण. |
| आनकदुंदुभिकन्याकुमार | वसुदेवाची कन्या सुभ द्रा तिचा मुलगा. |

| | |
|---|---|
| बाणजाळ | बाणाचा समुदाय. |
| एकसरें | एकदम. |
| सुभद्राबाळ | सुभद्रेचा मुलगा. |
| भगणें | तार्‍यांचे किंवा नक्षत्रांचे समुदाय. |
| पक्षिनायक | गरुड. |
| दंदशूक | सर्प. |
| चंडवात | मोठा वारा. |
| जळदजाळ | मेघांचे समुदाय. |
| मूढ | मूर्ख. |
| वाग्जाळ | पुष्कळ बोलणें, पांडित्य. |
| नाग | हत्ती. |
| बोध | तत्वज्ञान. |
| प्रत्यय | अनुभव, प्रचीती. |
| क्षुद्रानंद | हलके गोष्टींचा आनंद. |
| विरमती | नाहींसे होतात. |
| धनंजयकुमार | अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु. |
| जर्जर | त्रासलेली. |
| कर | हात. |
| पै | लागलेंच. |
| निर्वाण | भयंकर मोठें. |
| विंधिले | भेदिले. |
| भानुनंदन | सूर्याचा मुलगा कर्ण. |
| सुयोधन | दुर्योधन. |
| खिळिला | जखडून टाकला. |

| | |
|---|---|
| विंधिला | ताडिला, भेदिला. |
| गतवीर्य | निःशक्त, पराजित. |
| शौर्य | पराक्रम. |
| सुकुमार | फार कोमळ. |
| खड्ग | तरवार. |
| धनु | धनुष्य. |
| वळपत आहे | चोहींकडे फिरत आहे. |
| लवलाहे | लवकर, लागलींच. |
| पार्थसुत | अर्जुनाचा मुलगा. |
| अमित | असंख्य. |
| रथचक्र | रथाचें चाक. |
| चक्रधर | चक्र हातीं घेणारा. |
| विकळ | शक्तिहीन. |
| कुमार | मुलगा. |
| अशरीरिणी | आकाशवाणी. |
| वदली | बोलली. |



# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २ | २३ | सकल्प. | संकल्प. |
| २१ | १ | भडकत. | भटकत. |
| २२ | ११ | तुणीर. | तूणीर. |
| ४१ | १८ | जागाचा. | जगाचा. |
| ५० | १७ | आवशानें. | आवेशानें. |
| ५४ | ७ | पळालें. | पळाले. |
| ७७ | १२ | मुर्खाचें. | मूर्खाचें. |
| ८५ | १८ | असे. | असें. |
| ८६ | २२ | दावा. | दावी. |
| ८९ | ६ | घेइक्षुसमतें. | घेचापइक्षुस-मतें. |